


नोंदणी क्र. एफ.१६०१४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १६ वे ] जानेवारी १९६३ [ अंक ४



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

# नवभारत

वर्ष सोळावे | जानेवारी
अंक चवथा | १९६३

संपादक-मंडळ

आचार्य स. ज. भागवत—प्रा. वि. म. बेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ | सहामाही रु. ५ | अंकास रु. १

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा—मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि. सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्, मीमराववाडी, मुंबई २
फोन नं. २३५५४

[ मराठी साहित्य महामंडळाने ठरविलेले शुद्धलेखन अनुसरण्याचे ठरविले असून त्याप्रमाणे शुद्धलेखनपद्धति अनुसरली आहे. का. सं. ]

# सार-संकलन

## चीनचे गूढ

'न्यूयॉर्क टाइम्स्' दि. २५ नोव्हेंबर १९६२ च्या अकांत लिहितो :

"पोलादी पडद्यामागे काय चालले आहे यापेक्षाही बांबूच्या पडद्यामागील घडामोडी हे एक मोठेच कोडे आहे. चिनी नेते प्रत्येक गोष्ट अत्यंत गुप्तपणे करीत असतात. परदेशीय वार्ताहरांवर चीनमध्ये अत्यंत कडक नियंत्रणे असून त्याना बातमी काढणे अशक्य होते. आणि चिनी वृत्तपत्रे ही केवळ शिवीगाळींच्या कमजास्त प्रमाणावरूनच धोरणातील बदल सुचवीत असतात ! यामुळे चीन पुढे काय करणार याबद्दल अंदाज करायला बाह्य जगाला कसलाही आधार असत नाही. भारताविरुद्ध चढाई करून जात असताना एकदम जाहीर केलेला युद्धतहकुबीचा चीनचा निर्णय हे एक असेच उदाहरण आहे !

"या निर्णयामुळे चीनने आजवर निर्माण केलेल्या प्रश्नात भर पडली आहे. जगातील तटस्थ राष्ट्रातील प्रमुख व ज्याला वश करण्यासाठी सोविएट रशिया नाना प्रकारचे प्रयत्न करीत आहे अशा भारतासारख्या राष्ट्रावर चीनने हल्ला का करावा हा एक प्रश्न. आणि केल्यानंतर तो एकदम का थांबवावा हा दुसरा प्रश्न. या सर्वांची पार्श्वभूमी म्हणून जगातील आपल्या स्थानाविषयी चिनी नेत्यांची काय समजूत आहे हे एक मोठे कोडे आहेच.

"या प्रश्नांमुळे चीनच्या तीन स्पर्धाक्षेत्रात गोंधळ निर्माण झाला आहे. (१) आशियाई राष्ट्रांत वजन व प्रतिष्ठा याबाबतची चीनची भारताशी स्पर्धा (२) जगातील मार्क्सवाद्यात वैचारिक दृष्टीने वर्चस्व राखण्यासाठी चीनची सोविएटशी स्पर्धा, आणि (३) पाश्चात्य राष्ट्रें, विशेषतः अमेरिका, ही आपणास वेढा घालू पहात आहेत या भावनेतून निर्माण झालेली त्यांच्याशी स्पर्धा, अशी ही तीन क्षेत्रे होत. याबरोबरच चीन पुढे काय करणार हे एक सर्वात मोठे कोडे आहे.

## माओची राजवट

जगातील प्रत्येक पाच माणसात एक चिनी आहे. तथापि या सत्तर कोटी लोकांविषयी बाह्य जगाला काहीही माहीत नाही. कम्युनिस्ट सरकारने निर्माण केलेल्या अभेद्य गुप्त पडद्यापलीकडे ते रहात आहेत. अधिकृत बातम्या व काही निर्वासितांच्या कथा एवढेच काय ते इकडे येऊ शकते. आणि यावरूनच चीनमधील घडामोडींचा थोडाफार कयास करता येतो.

चीनमध्ये एकतंत्री राजवट आहे; तिला विरोध वा टीका खपत नाही; जनतेने सरकारी हुकूम पूर्णपणे पाळले पाहिजेत असा कटाक्ष आहे. चीनपुढे अत्यंत मोठे व बिकट असे आर्थिक प्रश्न आहेत हेही आपल्याला माहीत आहे. आर्थिक विकासाच्या "विशाल झेपे"चा बोजवारा उडाला आहे; माघार घेऊन उद्योगधंद्यांऐवजी शेतीवर पुनः लक्ष केंद्रित करावे लागले आहे. व अशा प्रकारे निदान जनतेला पोटापुरते अन्न मिळावे याची धडपड सुरू आहे. चीनमधील असंतोषाबद्दल मला अंदाजही करणे कठिण आहे. पेकिंगमधील राजवट लोकप्रिय आहे की नाही याबद्दल अंदाज करण्यास कसलाही आधार नाही.

चीनच्या अंतर्गत घडामोडींपेक्षा बाह्य संबंधाविषयी मात्र पाश्चात्यांना थोडीशी अधिक माहिती उपलब्ध आहे. रशियाशी चाललेला वैचारिक संघर्ष उघड झाला आहे. क्रुश्चेव्हच्या नेतृत्वाला त्यामुळे तडा गेला असून पाश्चात्यांबाबतच्या आपल्या आक्रमक व लढाऊ धोरणाला पेकिंगने कम्युनिस्ट जगांत थोडाफार पाठिंबा मिळवला आहे. आशियांतील सर्वात सामर्थ्यवान राष्ट्र म्हणून ओळखले जाण्याचीही पेकिंगची इच्छा आहे. पूर्वेकडे व आग्नेयेकडे अमेरिकेमुळे प्रतिबंध झाल्याकारणाने पेकिंग आतां पश्चिमेकडे म्हणजे भारतीय सीमेकडे झुकले आहे. आपल्या विस्ताराच्या महत्त्वाकांक्षेला या दिशेने पेकिंग कोठवर नेऊ इच्छिते, त्यासाठी माणसे व साधनसामुग्री यांचा कितपत उपयोग करण्याची त्याची तयारी आहे,








कितपत धोका पत्करण्यास ते सिद्ध आहे, हाही आज केवळ तर्काचाच विषय आहे.

आणखी एक अज्ञात क्षेत्र म्हणजे चीनमधील अणुशक्तीच्या विकासाचे! आपणास उपलब्ध असलेल्या सर्व साधनांचा उपयोग करून येनकेन प्रकारेण अण्वस्त्रे मिळवण्याची चीनची धडपड आहे. चीनचे अण्वस्त्रांचे चांचणीप्रयोग दोन वर्षांत सुरू होतील असा एक अंदाज आहे. तसे झाल्यास जगातील सत्तेच्या समतोलात मूलभूत बदल घडून येतील यांत शंका नाही.

तात्पर्य, चीन हे बाह्य जगाला अजून एक गूढच आहे. मात्र त्यात अनेक धोक्याचे व भयावह घटक दडलेले आहेत हे आता स्पष्ट झाले आहे.

## भारताला आव्हान

भारताच्या उत्तरेला असलेला हिमालय ही एक जगातील सर्वांत मोठी नैसर्गिक संरक्षक सीमा आहे. तिची सुरक्षितता गृहीत धरून व त्यामुळे चीनपासून धोका नाही असे समजून भारताने आपला आर्थिक विकासाचा प्रयोग चालविला होता. ही समजूत वा आशा आता नष्ट झाली आहे. काश्मीरमध्ये, लडाखमध्ये व तेथून पूर्वेस बाराशे मैल अंतरावरील नेफात अशा दोन ठिकाणी या हिमालयाच्या संरक्षक फळीला भगदाडे पडली आहेत. चीनच्या युद्धतहकुबीचा भारताने स्वीकार केला तरी त्यामुळे लडाखमध्ये या फळीच्या दक्षिणेस चिनी फौजा राहतील व नेफात त्या पलीकडे गेल्यातरी केव्हाही परत येऊ शकतील. चीनने सुचवलेली ७ नोव्हेंबर १९५९ ची सीमारेषा व भारताची ८ सप्टेंबर १९६२ ची रेषा यातील खरा फरक लडाखमध्ये आहे. ७ नोव्हेंबरनंतर भारताने काबीज केलेला लडाखमधील आपला प्रदेश त्याने सोडला पाहिजे असा चीनचा आग्रह आहे. एका अर्थी भारताने वस्तुतः युद्धतहकुबी स्वीकारल्याची चिन्हे दिसत आहेत; कारण भारतीय सेनेने चिनी फौजेशी संपर्क ठेवला असला तरी गोळी झाडलेली नाही. परंतु त्याबरोबरच चिनी योजना कितपत स्वीकार्य मानायची याविषयी भारतात पुष्कळच संदेह आहे.

लष्करीदृष्ट्या विजय मिळत असताना चीनने यावेळीच युद्धतहकुबी जाहीर का करावी ? पाश्चात्य राष्ट्रात याविषयी अनेक तर्कवितर्क सुरू आहेत, पण निश्चित उत्तर मात्र मिळालेले नाही.

चिनी कम्युनिस्टांच्या डावपेचांबद्दल एक गृहीत कृत्य असे आहे की लडाखमधील प्रदेश मिळता आल्यास नेफात जिंकलेला मुलुख सोडण्याची त्यांची तयारी आहे. तिबेट व सिंकियांग प्रांत याना जोडणारा एक महत्त्वाचा रस्ता या प्रदेशातून त्यानी बांधला असून तिबेटवरील नियंत्रण व्यवस्थित ठेवण्यासाठी त्यांना त्या रस्त्याचा ताबा कायमचा हवा आहे. चिनी राजवटीविषयी तिबेटमध्ये अजूनही असंतोष आहे. शिवाय, भारतासारखे राष्ट्र पूर्णपणे पादाक्रांत करण्याचा चिनी आक्रमणाचा हेतु होता हे अनेकांना खरे वाटत नाही. अशा आक्रमणाचे अत्यंत दूरगामी परिणाम झाले असते हे उघड आहे. आपणास अनुकूल अशी सीमा निश्चित करण्याव्यतिरिक्त चीनची उद्दिष्टे अत्यंत मर्यादित होती व ती साध्य झाली आहेत, असे म्हटले जाते.

आफ्रो-आशियाई राष्ट्रांच्या नेतृत्वाच्या स्पर्धेत भारतास आव्हान देणे हे एक उद्दिष्ट असावे. भारतीय सेनेच्या पराभवामुळे प्रबळ व तटस्थ राष्ट्रांचे नेतृत्व करणारे एक राष्ट्र या भारताच्या प्रतिष्ठेला धक्का बसला आहे. याच्याशी निगडित असे दुसरेही एक उद्दिष्ट असावे. ते म्हणजे आर्थिक विकासाऐवजी आपली साधनसामुग्री बऱ्याच प्रमाणांत सीमा रक्षणाच्या कामी उपयोगात आणणे भारताला भाग पडावे. हेही साध्य झाले आहे. भारताचा आर्थिक विकास व चिनी विकासकार्यातील गोंधळ व पीछेहाट ही आफ्रो–आशियाई राष्ट्रांच्या ध्यानात येऊन चुकली आहेत. भारताला अमेरिका व ब्रिटन याजकडून मिळू लागलेले वाढते साहाय्य हेही चीनच्या गणतीत ध्यानात घेतले गेले असावे. युद्ध चालू ठेवल्यास पाश्चात्य राष्ट्रांशी पक्क्यारीतीने निगडित झालेल्या भारताशी लढावे लागेल हे चीनच्या ध्यानात येणे स्वाभाविक होते.

## पेकिंग आणि मॉस्को

भारत-चीन युद्धामुळे क्रुश्चेव्ह व माओ यांच्या वैचारिक भूमिकांतील संघर्ष अगदी स्पष्टपणे उजेडात आला आहे.

क्रुश्चेव्हने "शांततामय सहजीवना"चा पुरस्कार करून तटस्थ राष्ट्रांना वश करण्याचे धोरण अवलंबिले आहे व त्यात भारताला अग्रस्थान देण्यात आले आहे.








रशिया भारताला आर्थिक सहाय देत आहे; त्यांत पोलादकारखाने उभारण्याची साधनेही आहेत. त्याने "मिग" विमानेही भारताला विकली आहेत. नेहरूंच्या मुत्सद्देगिरीची भरपूर स्तुतीही केली आहे. मॉस्कोशी भारताने निकटचे संबंध ठेवावेत यासाठी इतरही अनेक प्रकारचे प्रयत्न रशिया करीत आहे.

उलट, कम्युनिस्ट चीनचें धोरण कडक व आक्रमक आहे. यामुळे भारताविषयीची त्याची भूमिका भिन्न आहे. पूर्व–पश्चिम लढयांत तटस्थ राष्ट्रें कधीकाळी आपल्या बाजूस येतील असे पेकिंगला वाटत नाही. चिनी नेत्यांच्या क्रांतिवादी विचारसरणीत सुवर्णमध्याला मुळी स्थानच नाही. गेल्या २० ऑक्टोबरला चीनने भारतावर आक्रमण केले त्यावेळी क्रुश्चेव्ह अत्यंत अडचणीत होता. पेकिंगला पाठिंबा द्यावा तर भारताची सहानुभूति मिळवण्यासाठी केलेले आजवरचे प्रयत्न फुकट जातात. भारताला पाठिंबा दिल्यास पेकिंगशी असलेले बंधुत्व कायमचे नष्ट होते. यामुळे त्याने कालहरणाचा मार्ग स्वीकारला. भारताने चीनच्या अटी स्वीकारून शांततेची बोलणी सुरू करावी असे काहीसे जपूनच सुचविले. भारताने चीनची भूमिका सर्वस्वी त्याज्य असल्याची घोषणा केली; पण क्रुश्चेव्हने त्यांच्यावर दडपण आणले नाही. त्याबरोबरच भारताला "मिग" विमाने देण्याचा करार आपण पुरा करू अशी क्रुश्चेव्हने घोषणा केली, व पेकिंगचा रोष पत्करला.

चीन व रशिया यांच्यात रशियाच्या क्यूबाबद्दलच्या वर्तनाविषयी मतभेद होतेच. भारत-चीन युद्धामुळे त्यात अधिक कटुता आली. क्यूबात माघार घेतल्याबद्दल चीनने क्रुश्चेव्हवर कडक टीका केली. क्रुश्चेव्हने क्यूबाबाबत घेतलेल्या माघारीची भारताविरुद्ध आपल्या कडक धोरणाशी व त्याच्या यशाशी चीन तुलना करीत होते. परंतु चीन व रशिया यांच्यात उघड विरोध हा अजून पुष्कळच दूर आहे. त्यांचीही सीमा कितीतरी मोठी व बरीचशी अनिश्चित आहे. एकमेकांचा प्रदेश बळकावण्याची प्रवृत्ति अजून त्यांच्यात दिसत नाही. चीनला हवी तितकी आर्थिक मदत रशियाने केलेली नाही ( संबंध दुरावण्याचे हेही एक कारण आहे ), परंतु तरीदेखील कित्येक आवश्यक वस्तूंचा पुरवठा रशिया करीत आहे; त्यात पेट्रोलचा व अन्य तेलांचा उल्लेख प्रामुख्याने केला पाहिजे. पाश्चात्य राष्ट्रांचे दोघेही विरोधी आहेत. उघड उघड कलह झाल्यास जागतिक कम्युनिस्ट आंदोलनाला प्रचंड धक्का बसेल याची दोघांनाही जाणीव असल्याने त्यांचे सख्य कायम आहे.

## चीन, रशिया आणि पाश्चात्य राष्ट्रे

जगात सगळीकडे पाश्चात्यांच्या पुढाकारामुळे अस्तित्वात आलेले कम्युनिस्टविरोधी संरक्षक करार मोडून पडतील अशी परिस्थिती निर्माण करणे हा कम्युनिझमचा एक महत्त्वाचा उद्देश आहे. अतिपूर्वेकडील अशी एक संघटना म्हणजे '**सीॲटो**' ही होय. भारत-चीन युद्धामुळे ही संघटना व मध्य-पूर्वेतील 'सेंट्रो' ही संघटना या दोहोंचेही अस्तित्व धोक्यात आले होते. पाकिस्तान हा या दोन्ही संघटनांचा सभासद असून त्याचा गेली काही वर्षे भारताशी काश्मीरबाबत कलह सुरू आहे. भारताला लष्करी साहाय्य केल्यामुळे रागावून या दोन्ही संघटनातून बाहेर पडण्याची धमकी पाकिस्तानने दिली होती. या संधीचा फायदा घेऊन पाकिस्तानशी अनाक्रमणाचा करार करण्याची तयारी चीनने दाखवली होती. हे करार बाजूस ठेवले तरी जपान, कोरिया, तैवान ( फॉर्मोसा ) व दक्षिण व्हिएतनाम येथील अमेरिकन तळ म्हणजे आपल्याला विरोधी एक वेढाच होय अशी चीनची समजूत आहे. या तळावर, विशेषतः तैवान व आग्नेय आशियांतील तळावर, दडपण आणण्याचा प्रयत्न चीन करीत आहे. पण या बाबतीत फारसे पुढे जाण्याचे मात्र त्यांनी टाळले आहे. कारण तसे केल्यास अमेरिका उलट थप्पड दिल्यावाचून राहाणार नाही याची त्याला खात्री आहे. संयुक्त राष्ट्रसंघटनेत चीनचा प्रवेश होण्याच्या मार्गातही अडचण अमेरिकेचीच आहे. प्रचाराचे व्यासपीठ, डावपेचासाठी अधिक वाव, व प्रतिष्ठेत भर, या दृष्टीने चीनला हा प्रवेश हवा आहे.

चीनने स्वीकारलेल्या कडक व आक्रमक धोरणामुळे वास्तविक त्याला होणारा विरोध अधिक पक्का झाला आहे. आजवर अमेरिकेच्या तैवानविषयक धोरणासंबंधी अनेक मित्रराष्ट्रांतही गैरसमज होते; चीनला योग्य स्थान नाकारण्याच्या पाश्चात्यांच्या धोरणाबद्दल तटस्थ राष्ट्रे उघड उघड टीका करीत.

परंतु अशा प्रकारचा समजूतदारपणा चीननेच न दाखवल्यामुळे हे मतभेद व ही टीका मागे पडली आहे. कम्युनिस्टेतर जगात सावधपणे वागणारे चीनचे काही मित्र आहेत; उदाहरणार्थ, इंडोनेशिया. तथापि जगातील बहुसंख्य राष्ट्रे चीनकडे अनिश्चिततेपासून संशयापर्यंत निरनिराळ्या भावनांनी पाहात आहेत. पेकिंगने जगांत आपल्याच कृत्यांनी आंतरराष्ट्रीय एकाकीपणा ओढवून घेतला आहे.

## तटस्थांच्या प्राथमिक प्रतिक्रिया

भारत हे तटस्थ राष्ट्रांतले एक प्रमुख राष्ट्र. तेच चीनच्या सीमेवरील आक्रमणाचे लक्ष्य बनल्याने भारत–चीन युद्ध हा तटस्थ राष्ट्रांतील चर्चेचा विषय बनणे स्वाभाविक होते. चीनने युद्धतहकुबी पुकारून आपण काही अटींवर तिचा एकतर्फी अंमल करणार अशी घोषणा केल्यानंतर काही अविकसित राष्ट्रांतील महत्त्वाच्या प्रतिक्रिया पुढीलप्रमाणे होत्या.

रिओ द यानेरोतील ओ जोर्नाल मधील एका लेखांत अस्सी शॅतोब्रियाँ लिहितात : "चीन व भारत यांजमधील अघोषित युद्ध ही सात कोटी ब्राझिलियन जनतेलाही एक ताकीद आहे. झपाट्याने होणारा आर्थिक विकास, जागतिक प्रतिष्ठा व कलह टाळणारे हुषार आंतरराष्ट्रीय धोरण, यामुळे भारत हे एक आदर्श राष्ट्र समजले जात होते ...... भारतीयांइतके सहज फसवले गेलेले अर्धवट लोक जगात अन्यत्र सापडणे कठिण आहे... आमच्या प्रतिक्रियेची कटुता वाढण्याचे कारण ते आपल्याबरोबर ब्राझीलचे माजी अध्यक्ष जॅनियो कार्डॉस, अध्यक्ष जुआओ गुलार्त व सर्व ब्राझील यांनाही आपल्या समवेत घेऊन गेले हे होय."

रंगूनच्या 'मिरर' पत्रांत जवाना लिहितो : "चीनने इतर कोणीही न सांगता आपण होऊन परंपरागत सीमेच्या पलीकडे १२½ मैल जाण्याची तयारी दाखवली आहे. यावरून त्यांना सीमाप्रश्न शस्त्रबळाऐवजी शांततेच्या मार्गानेच सोडवायचा आहे हे सिद्ध होते."

लागोसच्या "वेस्ट आफ्रिकन पायलट" पत्रांत एल्. ए. सोदियो लिहितो : "चीनने आक्रमण केले आहे हे उघड आहे. केवळ भारतावरील आक्रमणाबद्दलच नव्हे तर आग्नेय आशियात वेळोवेळी युद्धजन्य परिस्थिती निर्माण केल्याबद्दल त्याचा निषेध केला पाहिजे........नायजेरियाने एकमुखाने भारतास पाठिंबा दिला पाहिजे. कम्युनिस्ट चिनी हे जगातील सर्वांत कृतघ्न लोक आहेत. त्यांना संयुक्त राष्ट्रसंघटनेत आणण्यासाठी गेली दहा वर्षे भारताने अविश्रांत श्रम केले. असे असताना त्यांचे भारताविषयीचे वर्तन पाहिले म्हणजे ते सुसंस्कृत वा सभ्य समाजांत राहण्याच्या लायकीचे नव्हेत असेच म्हणावे लागते.

जकार्तामधील 'मेर्देका' पत्र लिहिते : "चीनच्या सूचनेचा नेहरू अत्यंत मनःपूर्वक विचार करतील अशी आम्हास आशा आहे. कडक, निष्ठुर वा स्वार्थी वृत्तीने विचार केल्यास त्यांचेच नुकसान होणार आहे. भारताने अशी वृत्ती धारण केल्यास त्याला सर्व आफ्रो-आशियाई राष्ट्रांची सहानुभूति गमवावी लागेल यात शंका नाही."

केनियाचे मजूरमंत्री टॉम म्बोया म्हणतात : "आम्ही आपले तटस्थतेचे धोरणच चालू ठेवणार आहोत. चीनने पुकारलेल्या शस्त्रसंधीचा हा प्रश्न शांततेने सोडवण्याच्या दिशेने एक पाऊल म्हणून आम्ही स्वागत करतो. त्याचप्रमाणे हा प्रश्न सोडवताना दोन्ही बाजूंच्या म्हणण्यात जे योग्य व न्याय्य असेल ते विचारात घेतले जावे असे आमचे मत आहे."

कैरोचे 'अलहरम्' पत्र म्हणते : "चिनी फौजांचे पुढे पडणारे प्रत्येक पाऊल हा बांडुंगच्या तत्वांचा विजय नसून पराभव आहे– त्यायोगाने आफ्रो-आशियाई ऐक्याला धक्का बसत आहे. चीनने हे रक्तलांछित आव्हान ताबडतोब थांबवले पाहिजे, आणि आक्रमणापूर्वीच्या ठिकाणी परत गेले पाहिजे."

याच प्रश्नाचा ऊहापोह करताना 'न्यूयॉर्क टाइम्स'चा थॉमस् जे. हॅमिल्टन लिहितो : "चीनला भारताशी निर्वाणीचे युद्ध लढायचे आहे की सीमा प्रदेशातील काही हजार चौरस मैलांचा मुलुख गिळून तो तूर्त स्वस्थ बसणार आहे, हे आत्ताच सांगणे कठीण आहे. पण ते काहीही असले तरी आशिया व आफ्रिका खंडातील, काही अपवाद वगळल्यास, बहुतेक राष्ट्रांनी भारताला पाठिंबा देण्याचे टाळले आहे. यामुळे पुनः मौलिक स्वरूपाचे विचारमंथन सुरू होणे अपरिहार्य आहे. ही तटस्थ राष्ट्रे गेली कित्येक वर्षे आपल्या ऐक्यासंबंधी घोषणा करीत आहेत. पण तटस्थता व



अनुक्रमणिका

कम्युनिस्ट राजवटींबरोबर "शांततामय सहजीवन" जगण्याबद्दल उठल्या सुटल्या बोलणाऱ्या त्यांच्यातील एकावर हल्ला होताच इतरांनी गप्प रहावे ही एक आश्चर्यकारक घटनाच म्हटली पाहिजे. संयुक्त अरब प्रजासत्ताकने भारताला पाठिंबा देण्यासाठी भारताला मान्य होतील अशा अटींवर समझोता करण्याचा प्रयत्न केला. पण पेकिंगने ती भूमिका मान्य केली नाही. इतर आफ्रिकन राष्ट्रें ही शांतच राहिली ! कोरियन युद्धानंतर अत्यंत मोठा असा हा युद्धाचा प्रसंग, पण तो संयुक्त राष्ट्र-संघटनेपुढे आणण्याचा प्रयत्न एकाही आशियाई वा आफ्रिकन राष्ट्राने केला नाही. याच्या मुळाशी भीति असावीसे वाटते. भारताला याबद्दल परतफेड करण्याचे सामर्थ्य नाही; पण कम्युनिस्ट चीन मात्र तसे करू शकतो. ही स्तब्धता काहीशी चमत्कारिक दिसते. भारताने गतवर्षी गोव्यावर हल्ला केला असताना ही सर्व राष्ट्रे भारताला पाठिंबा देण्यासाठी पुढे सरसावली होती. सुरक्षा मंडळाच्या दोन आफ्रिकन सभासदांनी तर गोव्याचा प्रश्न सोडवण्यासाठी पोर्तुगालने 'सहकार्य' द्यावे असा आदेश देण्याचा ठराव मांडण्यापर्यंत मजल मारली होती.

संयुक्त राष्ट्रसंघटनेपुढे हा प्रश्न न आणण्याची कारणे भारताने दिली आहेत. चीन हा सभासद नसल्याने काही करता यावयाचे नाही; व खुली चर्चा झाल्यास सोविएटला चीनची बाजू घ्यावी लागेल. पण तटस्थ राष्ट्रेंतरी आपणास पाठिंबा देतील की नाही याबद्दल भारताला शंका असावीसे दिसते. तीं कदाचित् तटस्थ राहतील व भारताला पाश्चात्य राष्ट्रे व अमेरिका यांच्या मदतीनेच आपली बाजू सावरावी लागेल अशी भीति वाटत असावी असा संभव आहे. कॅसाब्लांका गटातील राष्ट्रांनी (घाना, गिनी, माली, यू. ए. आर. अल्जिरिया व मोरोक्को) तर गोवा घेताना भारताने केलेला युक्तिवाद आता भारताच्या विरुद्ध वापरण्यास आरंभ केला आहे. त्यांचे म्हणणे असे की, "पोर्तुगालने 'साम्राज्यशाहीचा अवशेष' असलेल्या गोव्याबाबत चर्चा करण्याचे नाकारले म्हणून भारताने तेथे सैन्य पाठवले. भारताचा चीनशी लढा हाही बव्हंशी मॅक्माहोन रेषेवर आधारलेला आहे. पण ही रेषा हाही साम्राज्यशाहीचा अवशेष असून भारताचे तिच्या संबंधीचे धोरण हे पोर्तुगालसारखेच नाही काय ?" ते अगदी सामान्य वा क्षुद्र आहेत या भावनेने इतरांशी वागण्याच्या भारतीयांच्या प्रवृत्तीविरुद्ध या राष्ट्रांची ही काही प्रमाणात प्रतिक्रिया आहेसे म्हणता येईल. संयुक्त राष्ट्रातील भारतीय प्रतिनिधीने अनेकवळा अकारण इतरांना दुखविले आहे. तथापि अनेक तटस्थ राष्ट्रे भारताच्या अडचणींबद्दल बरीच बेफिकीर आहेत यात शंका नाही. भारतांत जे घडले त्यामुळे ही राष्ट्रे भारताच्या मदतीस जातील किंवा आपले तटस्थतेचे धोरण सोडण्यास तयार होतील असे समजणे चुकीचे ठरेल.

## कुश्चेव्ह–टिटो वि० माओ ?

एडवर्ड क्रँकशॉ आणि लायो लेडरर हे 'ऑब्झर्वर' (लंडन) च्या दि. ९ डिसेंबर १९६२ च्या अंकात लिहितात :

"गेल्या आठवड्यात क्रेमलिन (मॉस्को) मध्ये झालेल्या क्रुश्चेव्ह व टिटो यांच्या "खाजगी" चर्चेत जागतिक कम्युनिस्ट आंदोलन पुनरुज्जीवित करून त्यास मजबुती आणण्याची एक दूरगामी योजना आखण्यात आली असून तिचा अंमल करताना चीनशी प्रकट कलह झाला तरी तो पत्करावा असे ठरले आहे. या निर्णयामुळे रशिया व चीन यांच्यातील कलह हा कायमचा न मिटणारा कलह होण्याचा संभव आहे. यामुळे पूर्व-पश्चिम कलहावर होणाऱ्या परिणामांची कल्पना करणे कठीण आहे. सोविएट व युगोस्लाव कम्युनिस्ट पक्षात सलोख्याचे संबंध नव्याने निर्माण व्हावेत यासाठी गेले वर्षभर प्रयत्न सुरू आहेत. गेल्या सप्टेंबरमध्ये या कल्पनेस तत्त्वतः मान्यता देण्यात आली. सोविएटचे अध्यक्ष ब्रेझनेव यानी त्यावेळीच युगोस्लाव्हियाला भेट दिली होती. कम्युस्टि पक्षांच्या पारस्परिक संबंधांबद्दल सोविएट पक्षाच्या मध्यवर्ती समितीतील युरी अँद्रोपॉव्ह हा जबाबदार आहे. यानेच मार्शल टिटोशी विस्तृत चर्चा करून यासंबंधीचे प्राथमिक कार्य केले आहे. टिटोच्या दृष्टीने हीं बोलणीं समाधानकारक झाल्यामुळेच त्याने मॉस्कोला भेट देण्याच्या निमंत्रणाचा स्वीकार केला. १९५५ मध्ये क्रुश्चेव्हने बेलग्रेडला भेट दिली त्यावेळी कम्युनिस्ट पक्षांच्या सलोख्याच्या संबंधांविषयी काही तत्त्वे व








त्यावर आधारलेल्या काही अटी सुचवल्या होत्या; पण त्यावेळी क्रुश्चेव्हने त्या अमान्य केल्या होत्या. आता त्या अटी स्वीकारण्यात आल्या आहेत.

त्यावेळी युगोस्लाव्हियाने राज्याच्या ( सरकारच्या ) पातळीवर सोविएटशी मित्रत्वाचे संबंध प्रस्थापित केले खरे; पण कम्युनिस्ट पक्षांचे सलोख्याचे संबंध प्रस्थापित होण्यापूर्वी काही बाबींचा विचार झाला पाहिजे असे स्पष्ट केले होते. उदाहरणार्थ, जग हे दोन सर्वथैव व पूर्णपणे विरोधी गटात विभागले गेले आहे हा सोविएट सिद्धांत सोडला पाहिजे. मित्रत्वाचे संबंध असलेल्या पक्षांची धोरणे आंखून देण्याचा आव सोविएट पक्षाने आणता कामा नये. समाजवादाकडे जाण्याचे अनेक मार्ग असू शकतात ही गोष्ट केवळ तत्वतःच नव्हे तर प्रत्यक्ष व्यवहारातदेखील सोविएटने स्वीकारली पाहिजे. १९५५ सालचा समझोता झाल्यापासून युगोस्लाव्ह पक्षाशी संबंध सुधारणे हा क्रुश्चेवचा एक महत्त्वाचा राजकीय उद्देश होता. तथापि तो साधण्याचा निश्चित मार्ग कोणता याविषयी आजवर त्याचा निर्णय तरी होत नसावा किंवा ( युगोस्लाव्हियाच्या मताप्रमाणे ) तो आपल्या पदावर पूर्ण स्थिर नसल्याने आवश्यक पावले टाकण्यास तो कचरत तरी असावा. तथापि गेला आठवडाभर काहीतरी बऱ्या घटना घडत आहेत अशी चिन्हें स्पष्ट दिसत होती. आता हा समझोता झाला आहे असे दिसत आहे.

क्रुश्चेव्ह या दिशेने पावले टाकण्याच्या विचारात आहे हे माहीत असल्याने चीनने त्याच्यावर कडाडून हल्ला चढविला होता. तथापि त्या टीकेस न जुमानता ही पावले त्याने टाकावीत ही एक आंतरराष्ट्रीय राजकारणातील अत्यंत महत्त्वाची घटना होय. चीनने पूर्णतया नमते घेतल्यास गोष्ट निराळी; नाहीपेक्षा यापुढे जागतिक कम्युनिस्ट आंदोलनात दोन "पोप" निर्माण होणे अपरिहार्य आहे. एक पाश्चात्य राष्ट्रांशी लढावयास सांगणारा व दुसरा त्यांच्याशी जुळते घ्यावे असे म्हणणारा. "

---

## जगाचे डोळे व पाय – ज्ञान आणि विज्ञान

विज्ञान वाढलेंच पाहिजे, मी विज्ञानाचा मोठा उपासक आहे. परंतु विज्ञानामध्ये दुहेरी शक्ति आहे. त्याची एक विनाशकारक शक्ति आहे आणि दुसरी विकासकारक शक्ति आहे. विज्ञान सेवा करू शकते आणि संहारही करू शकते. अग्नीचा शोध लागला त्या द्वारे स्वयंपाक बनूं शकतो. आणि घराला आगही लागू शकते. अग्नीचा उपयोग घर जाळण्यासाठी करावयाचा की चूल पेटविण्यासाठी करावयाचा ही अक्कल विज्ञानामध्ये नाही. ही अक्कल आत्मज्ञानामध्ये आहे. जसा पक्षी दोन पंखानी उडत असतो. माणूसही आत्मज्ञान आणि विज्ञान या दोन शक्तींनी विकसित होऊन सुखी होतो. प्रत्येक यंत्रामध्ये दोन प्रकारच्या शक्ति असतात. एक शक्ति असते गति वाढविणारी, दुसरी शक्ति असते दिशा दर्शविणारी. मोटारमध्ये दहा मैलांची गति आहे. ती वाढवून वीस मैल किंवा तीस मैल करणे हे काम एका यंत्रावर अवलंबून असते. परंतु मोटार पूर्व दिशेला न्यावयाची हे काम एक दुसरे यंत्र पार पाडते. यातून एक यंत्र जर नसेल तर काम होणार नाही. मोटारीला ह्या दोन्ही यंत्राची गरज राहते. आपण पायानी चालतो. आपण डोळयानी चालत नाही. परंतु डोळयानी आम्हाला दिशा दिसते. अशा प्रकारे **आत्मज्ञान आहे डोळे आणि विज्ञान आहे पाय.** जर माणसाला आत्मज्ञानाची दृष्टि नसेल तर तो आंधळा कोठे जाईल याचा पत्ता नाही. डोळे आहेत, परंतु पाय नाहीत. तो इकडे तिकडे पाहू शकेल, परंतु पायाशिवाय त्याला घरीच बसून राहावे लागेल. यासाठी विज्ञानाशिवाय संसारामध्ये काही कामच होऊं शकणार नाही. आणि आत्मज्ञानाशिवाय विज्ञानाला योग्य दिशा मिळणार नाही.

**--आचार्य विनोबा भावे**









अनुक्रमणिका

प्रा. चन्द्राबेन दलाया

# परदेशी मदत

सध्या परदेशी मदत हा शब्दप्रयोग नानाविध संदर्भांतून वापरला जातो. सुरवातीलाच आपण त्याचा नक्की अर्थ काय होतो ते पाहू. परदेशी मदतीच्या कक्षेत नुसतीच एका राष्ट्राने दुसऱ्या राष्ट्रास दिलेली देणगी, वा व्याज न आकारता दिलेले कर्ज, एवढ्याच गोष्टींचा समावेश होत नसून त्यात एका राष्ट्राने दुसऱ्या राष्ट्रास दिलेल्या किंवा एखाद्या आंतरराष्ट्रीय संस्थेने देऊ केलेल्या सर्व प्रकारच्या गोष्टींचा यात अंतर्भाव करावा लागेल.

आपण आंतरराष्ट्रीय पातळीवरून या परदेशी मदतीच्या प्रश्नाचा विचार केल्यास बऱ्याच राजकीय आणि सामाजिक गोष्टी त्याच्याशी निगडित असलेल्या दिसून येतात. गेल्या शतकात पुढारलेल्या देशांतून अल्पविकसित किंवा अविकसित राष्ट्रांकडे भांडवलाची निर्यात अविरतपणे चालू होती. अर्थात या पाठीमागे मुख्य हेतू जास्तीत जास्त नफा मिळविण्याचाच असे, मग ते इंग्लंडमधून अमेरिकेत जाणारे भांडवल असो, वा कॅनडा किंवा आफ्रिकन आणि आशियाई देशात जाणारे असो. त्यावेळचे सामाजिक आणि राजकीय वातावरणसुद्धा अशा प्रकारच्या प्रवाहाला पोषक असेच होते. १९१४ नंतर मात्र हा भांडवलाचा झरा आटल्यासारखाच झाला ! आफ्रिकन आणि आशियाई राष्ट्रांतील वाढत्या राष्ट्रवादाने परदेशी भांडवलाविरुद्ध बंडाचे निशाण उभारले. त्यात राष्ट्रीयीकरणाच्या चळवळीची नि परदेशी कंपन्यांवरील नियंत्रणांची भर पडली. वेगवेगळ्या वसाहती स्वतंत्र होऊं लागल्यामुळे परदेशांत भांडवल गुंतविण्यात धोका वाढू लागला. जरी मागासलेल्या राष्ट्रांत पैसा गुंतविण्यात अजूनही फायदा होता तरी जर्मनी, इंग्लंड, अमेरिका, यासारख्या प्रगत राष्ट्रांमध्येही उत्पन्नवाढीमुळे भांडवल गुंतविण्यास जास्त उपकारक वातावरण निर्माण झाले होते. आर्थिक विकासाच्या मार्गावर असलेल्या राष्ट्रांना तोंड द्यावा लागणारा मुख्य प्रश्न म्हणजे आयात व निर्यात यांचा मेळ बसवणे. याकरताच अनेक प्रकारच्या व्यापारावर कडक निर्बंध बसवावे लागतात. भराभर वाढणाऱ्या किंमती, करवाढ, वाढते राष्ट्रीयीकरण, या गोष्टींमुळे परदेशी भांडवलाच्या प्रवाहाला कायमची ओहोटी लागते. येथे एक गोष्ट मात्र स्पष्टपणे नमूद केली पाहिजे. ती म्हणजे जरी विसाव्या शतकांत परदेशी भांडवलाचा झरा आटला तरी त्याचा अर्थ असा नव्हे का मागासलेल्या राष्ट्रांची गरज पण संपली, उलट, दिवसेदिवस ती तीव्रतेने जाणवू लागली आहे. युद्धोत्तर कालांत एकामागोमाग एक बऱ्याच वसाहतींना स्वातंत्र्य मिळाले. वहातुकीच्या नि दळणवळणाच्या साधनांमुळे या राष्ट्रांचा जास्त प्रगत राष्ट्रांशी संबंध येऊ लागला, तेथील उच्च राहाणीमानाची जाणीव झाली. आंतरराष्ट्रीय संस्था, जागतिक परिषदा, परदेशी चित्रपट, शिक्षणासाठी परदेशी जाणारे विद्यार्थी, यामुळे मागासलेल्या नि पुढारलेल्या राष्ट्रांचा अधिकाधिक संबंध येऊ लागला. आपलेही राहणीमान तसेच करण्यासाठी धडपड सुरू झाली, नि त्यामुळेच परदेशी भांडवलाबद्दलचा विरोध थंडावू लागला. आर्थिक विकास साधण्यासाठी, राहाणीमान वाढविण्यासाठी, परदेशी भांडवलाचा वापर करावा अशा विचारांचे वारे वाहू लागले.

## अविकसित राष्ट्राच्या अडचणी

आर्थिक विकास साधण्यासाठी अल्पविकसित राष्ट्रांनी आर्थिक नियोजनाच्या रामबाण उपायाचा अवलंब तर केलेलाच आहे, पण हे काम सोपे कां आहे ? वेगवेगळ्या आर्थिक साधनांचा, मुख्यत्वेकरून भांडवलाचा, तुटवडा येथे पावलोपावली जाणवतोच. राष्ट्रीय उत्पन्न मूळचेच कमी, त्यामुळे बचत तुटपुंजी; त्यात वाढती महागायी. त्यामुळे आर्थिक विकासाकरिता जरूर असलेल्या आर्थिक साधनांकरिता परदेशी मदत हा एकच मार्ग शिल्लक रहातो. त्याचा अवलंब न केल्यास अंदाजपत्रकात भलतीच तूट येते. शिवाय यंत्रसामुग्री, तंत्रज्ञ, कच्चामाल, यांचाही अभाव आहेच.








जोरदार विकासासाठी अत्यावश्यक असणाऱ्या उद्योग-धंद्यांच्या वाढीसाठी या सर्वांची तरतूद करणे जरूर आहे. शिवाय एखाद्या राष्ट्राने आर्थिक विकासाच्या दृष्टीने हातपाय हलविण्यास सुरवात केली की एकूण आयात-निर्यातीला सुद्धा एक वेगळेच वळण लागते. एकूण राष्ट्रीय मागणीत भलतीच वाढ होते. ग्राहकोपयोगी नि उत्पादनोपयोगी दोन्ही प्रकारच्या वस्तूंची मागणी वाढते. देशात उपलब्ध असलेल्या साधनांचा विचार करता वाढत्या मागणीला तोंड देण्याचा एकच मार्ग असतो व तो म्हणजे काही अंशी तरी परदेशातून आयात करून ही मागणी पुरविणे! मोठ्या प्रमाणावर शेतकी उत्पादन असणाऱ्या व ते निर्यात करण्याइतका साठा करू शकणाऱ्या काही भाग्यवान राष्ट्रांची गोष्ट बगळल्यास निर्यात मात्र कमीकमी होत जाते किंवा फारतर आहे तितकीच रहाते. वाढ मात्र होत नाही. देशी बाजारपेठातूनच जास्त नफा होण्याची शक्यता निर्माण झाल्यामुळे देशातल्या देशात गुंतविल्या जाणाऱ्या पैशात वाढ होते नि निर्यात वाढण्याची आशाच खुंटल्यासारखी होते. यातून येणाऱ्या तुटीतूनच परदेशी चलनाचा प्रश्न भेडसावू लागतो.

## निर्यात वाढविणे सोपे नाही

या प्रश्नाला तोंड देण्याचे अनेक मार्ग आहेत. एक म्हणजे आयात कमी करणे नि निर्यात वाढविणे. पण येथे एक गोष्ट मात्र लक्षात ठेवली पाहिजे. ती म्हणजे आर्थिक विकासाला अत्यावश्यक असणाऱ्या गोष्टींच्या आयातीवर याचा परिणाम होऊन आर्थिक विकासाची गतीच खुंटल्यासारखी होण्याचा संभव आहे. म्हणूनच हा पर्याय तितकासा समाधानकारक नाही. विशेषतः आर्थिक प्रगतिपथावर जोरदार दौड मारू इच्छिणाऱ्या राष्ट्रांच्या दृष्टीने तर नाहीच नाही. लोकशाही तंत्रपद्धतीच्या राजवटीत तर अशा प्रकारच्या आयातीवरील कडक निर्बंधामुळे तीव्र असमाधान पसरण्याची शक्यता असल्यामुळे अगदी शेवटचेच अस्त्र म्हणून हे वापरता येईल. निर्यात वाढविणे तरी काय सोपे काम आहे म्हणता? छे! थोडयाशा प्रयत्नाने ते साधणे शक्य नाही. याकरिता भगीरथ प्रयत्न केले पाहिजेत. त्याकरिता द्रव्यसाहाय्य द्यावे लागेल, अप्रत्यक्ष किंवा प्रत्यक्ष कोटापद्धती अमलात आणावी लागेल. शिवाय जागतिक बाजारपेठेत प्रगत राष्ट्रांच्या चढाओढीला तोंड द्यावे लागेल ते निराळेच! मागासलेल्या देशात उत्पादनखर्च जास्त असतो पण निर्मित वस्तू मात्र प्रगत राष्ट्रांतल्याइतकी तरी दर्जेदार असेल असे सांगवत नाही. त्यामुळे नवीन नवीन बाजारपेठातून जम बसविणे जड जाते. या सर्व कारणांमुळे भारतातून निर्यात होणाऱ्या ज्यूट, चहा, किंवा काही आफ्रिकन राष्ट्रांतून निर्यात होणाऱ्या रबर, कोको या विशिष्ट मालाचा अपवाद सोडल्यास निर्यात वाढविणे जवळजवळ अशक्यप्रायच असते. यामुळे होते काय तर परराष्ट्रीय व्यापारात येणारी तूट भरून काढावी लागते. अत्यंत निकडीचे असले तरी अल्पावधीत निर्यात वाढविणे अतिशय जिकीरीचे व काहीवेळेस तर जवळजवळ अशक्यप्रायच होऊन बसते. हा यक्षप्रश्न सोडविणे एकाच गोष्टीने शक्य आहे. ते म्हणजे परदेशी मदतीचा आधार घेऊन! जर खाजगी परदेशी मदत मिळाली तर हा प्रश्न सोडविणे बरेच सोपे जाते, नाहीतर मात्र दुसरे मार्ग शोधावे लागतात.

## युद्धोत्तर काळातील बदल

युद्धोत्तर कालात प्रगत राष्ट्रांच्या या प्रश्नाकडे पहाण्याच्या दृष्टिकोनात स्वागतार्ह बदल झाला. युरोपात यशस्वी झालेल्या मार्शल अेड योजनेमध्ये अशा मदतीमुळे होणारे राजकीय आणि आर्थिक फायदे दिसून आले. त्यांतच लॉर्ड किनस्ने असे स्पष्टपणे प्रतिपादन केले की प्रगत राष्ट्रातील आर्थिक सुबत्ता टिकवावयाची असेल तर त्यानी त्यात इतर कमी प्रगत देशांना पण सहभागी करून घेतले पाहिजे. मागासलेल्या राष्ट्रांचा आर्थिक विकास घडून आल्याने प्रगत राष्ट्रांना आर्थिक दृष्ट्या बळकटी तर येतेच पण शिवाय त्यांचे आर्थिक स्थैर्य टिकविण्यास मदत होते. नवीन नवीन बाजारपेठा निर्माण होतात. भांडवल गुंतविण्यास क्षेत्र विस्तृत होते. राजकीय दृष्ट्या, मागासलेल्या देशांच्या विकासाने आंतरराष्ट्रीय तंटे कमी होऊन जागतिक शांतता टिकविण्यास मदत होते. कम्युनिझमची लाट थोपवून धरण्यास सुद्धा याची मदत होण्यासारखी आहे. राजकीय आणि आर्थिक पातळीवरूनच नव्हे तर नैतिक दृष्टिकोनातूनसुद्धा सुधारलेल्या राष्ट्रानी अविकसित








राष्ट्रांना मदत केली पाहिजे हे मत आज जगन्मान्य झाले आहे. मागासलेल्या राष्ट्रांची प्रगती साधण्याचा परदेशी मदत हा एक न्याय्य व योग्य मार्ग आहे याबद्दल आज दुमत नाही.

## राष्ट्रीयीकरणाची वाढती मागणी

आपल्या भारताला स्वातंत्र्यपूर्व काळात सुद्धा बरी-चशी परदेशी मदत मिळत असे. पण त्याकडे त्यावेळी पहाण्याचा दृष्टिकोन मात्र तितकासा चांगला नव्हता. स्वातंत्र्योत्तर कालात राष्ट्रीयीकरणाबद्दलची मागणी वाढतच गेली. सुरवाती सुरवातीस बरेचसे परदेशी भांडवल काढून घेण्यात आले. पण नंतर आर्थिक नियोजनाच्या मार्गाचा अवलंब केल्यामुळे नि आंतर-राष्ट्रीय व्यापारात नेहमी येणाऱ्या तुटीमुळे परदेशी भांडवलाची मदत घेणे अपरिहार्य होऊन बसले.

पहिल्या पंचवार्षिक योजनेत मुख्य भर शेतकी-विकासावर देण्यात आला होता नि मोठ्या उद्योगधंद्यांत त्या मानाने कमी पैसा गुंतविला गेला होता. त्यामुळे परदेशी व्यापारात फारशी तूट जाणवली नाही. शिवाय आपल्याकडे स्टर्लिंगचा साठा बराच असल्यामुळे आवश्यक ती आयात करण्यास फारसा त्रास झाला नाही. इ. स. १९५६ नंतर मात्र या गोष्टींना एक वेगळेच वळण लागले नि परदेशी चलनाचा प्रश्न एक कूटप्रश्न होऊन बसला !

## लोकसंख्येतील बेसुमार वाढ

काही वेळेस असे प्रतिपादन केले जाते की भारताने लवकरात लवकर स्वयंपूर्ण झाले पाहिजे. परदेशी भांड-वलाची आयात ताबडतोब थांबविली पाहिजे; पण भारतापुढील आर्थिक प्रश्नांचा समतोलपणे विचार केल्यास या मताला कसलाच आधार नाही असे दिसून येईल. लोकसंख्या दिवसेंदिवस वाढते आहे. नजीकच्या भविष्यकाळात ती आटोक्यात आणता येईल असे काही चिन्ह दिसत नाही. शिवाय राहणीमान उच्च-स्तराप्रत नेण्यासाठी लोकांची खटपट वाढते आहे. जोर-दार आर्थिक विकास हा एकच उपाय असा आहे की त्यामुळे हे व अशा प्रकारचे अनेक प्रश्न सोडविता येतील. पहिल्या व दुसऱ्या पंचवार्षिक योजनांच्या काळात जरी बरेचसे भांडवल गुंतविले गेलेले असले तरी वाढत्या लोकसंख्येचा विचार करता लोकांचे राहणी-मान वाढविण्यास ते अपुरेच पडले. इ. स. १९५५-५६ ते १९५९-६० या काळात राष्ट्रीय उत्पन्न जरी १२ टक्क्यानी वाढले तरी १९५९-६० सालात राष्ट्रीय उत्पन्नात झालेली वाढ स्थिर किंमती ठेऊन पाहिली तर ती एकच टक्का असलेली दिसून येते. म्हणजे राष्ट्रीय उत्पन्नात झालेली वाढ अगदीच कमी आहे. म्हणूनच वाढत्या लोकसंख्येबरोबरच जास्त जास्त भांडवल आर्थिक विकासकार्यात गुंतविले पाहिजे. यापुढे सुद्धा देशातील चलनाचा पुरवठा वाढवून किंवा आंतर्देशीय कर्जे काढून उपलब्ध असलेल्या साधनांचा अधिक उपयोग करून घेतला पाहिजे. एवढे करून सुद्धा कच्चा माल, तंत्रज्ञ, काही प्रकारची उत्पादनोपयोगी यंत्रसामुग्री, यांचा तुटवडा राहतोच ! निर्यात वाढवून त्यापासून अशा प्रकारच्या अत्यावश्यक वस्तूंची आयात करता येईल. पण आधीच देशात भासणाऱ्या वेगवेगळया गोष्टींच्या तुटवड्याला त्यामुळे अधिकच गंभीर स्वरूप येऊन सार्वत्रिक किंमतवाढ होण्याची येथेही भीती आहेच ! शिवाय सक्तीने निर्यात वाढविणे हुकूमशाही राजवटीत जरी सोपे असले तरी लोकशाही भारतात ते सुलभ आहे की नाही, नि असले तरी कितपत योग्य नि हितावह आहे, हे ठरविणे जरा कठीणच ! खाजगी विभागाला ( Private Sector ) सुद्धा आर्थिक विकासकार्यात बराच महत्त्वाचा वाटा उचलावयाचा असल्यामुळे वर वर्णिलेल्या मार्गाचा अवलंब केल्यास विकासाची गतीच रोखली जाईल आणि यामुळेच इतर कुठल्याही मार्गाचा स्वीकार करण्यापेक्षा परदेशी मद-तीचा अंगीकार करणे जास्त हितप्रद ठरेल हे निःसंशय !

आता आपण ही अत्यावश्यक असलेली परदेशी मदत कुठल्या मार्गाने मिळवावयाची या प्रश्नाकडे वळू. खाजगी परदेशी मदत ही ठराविक चाकोरीतच नि मर्यादित स्वरूपातच मिळणार. येथे एक गोष्ट मात्र स्पष्ट केली पाहिजे. ती म्हणजे परदेशी मदत घेणे जरी योग्य असले तरी ते ठराविक मुदतीपर्यंतच. सुरुवाती-सुरुवातीला ती जरी योग्य असली तरी पुढे मात्र त्या राष्ट्राने जास्त स्वयंपूर्णता मिळविली पाहिजे. आर्थिक विकासमार्गातील सुरवातीचे अडथळे दूर होऊन योग्य ती पार्श्वभूमी तयार झाली की आर्थिक विकास जास्तीत जास्त स्वयंपूरक ठरेल इकडे लक्ष दिले गेले पाहिजे.



अनुक्रमणिका

## पंचवार्षिक योजनांसाठी भांडवलाची जरूरी

भारतात परदेशी मदतीची आवश्यकता इ. स. १९५६ नंतर अतिशय तीव्रतेने भासू लागली. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेत बऱ्याच मोठ्या प्रमाणात भांडवल गुंतविले जाणार होते. पण आपल्या सरकारच्या कर-विषयक धोरणांमुळे नि परदेशी भांडवलावर लादण्यात आलेल्या कडक निर्बंधांमुळे परदेशी खाजगी भांड-वल जरूरीइतके मिळेल अशी आशा नव्हती. यामुळेच खाजगी परदेशी भांडवलापेक्षा परदेशी मदत स्वीका-रणे जास्त योग्य असे सरकारने ठरविले. दुसऱ्या पंच-वार्षिक योजनेत आर्थिक विकासाची गती वाढविण्या-साठी प्रयत्न सुरू झाले. औद्योगिक प्रगतीवर भर देण्यात आला. यामुळे आंतरराष्ट्रीय व्यापारात येणाऱ्या तुटीचे प्रमाण वाढले नि देशातही किंमतवाढीचे चक्र सुरू झाले. तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या काळातसुद्धा या गोष्टी आहेतच. पहिल्या पंचवार्षिक योजनेच्या काळात प्रतिवर्षाची सरासरी तूट ५७ कोट रुपये होती, तर दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या काळात ती ४१४ कोट रुपयापर्यंत गेली ! १९५०-५१ मध्ये आपल्याकडे ९५१ कोट रुपयांचा परदेशी चलनाचा सांठा होता. १९५५-५६ मध्ये तो ८२५ कोट रुपयांवर आला नि १९६०-६१ मध्ये तो ३०४ कोट रुपयांवर घसरला ! या सर्व गोष्टींमुळेच परदेशी मदत एक अत्यावश्यक बाब होऊन बसली. दुसऱ्या पंच-वार्षिक योजनेच्या काळात आपल्याला मिळालेली परदेशी मदत एकूण २५६९ कोट रुपये होती. १९६१ च्या मार्चमध्ये १२५९ कोट रुपये उपलब्ध होते. यात अमेरिकेचा हिस्सा ५९ टक्के आहे. तिसऱ्या योजनेत एकूण २२०० कोट रुपयांपर्यंत मदत लागेल असा अंदाज आहे. ( एकूण खर्च ७५०० कोट रुपये येणार आहे. ) शिवाय खाजगी परदेशी कंपन्या भांडवलाची आयात करतील ती निराळीच.

## हुंडणावळीची चणचण

इ. स. १९५६ पासून परदेशी चलनाचा अंगीकार करून सुद्धा परदेशी चलनाची चणचण गंभीरपणे वेळोवेळी का जाणवते हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे. प्रमुख कारण म्हणजे आपल्याकडे असलेला परदेशी चलनाचा तुटपुंजा सांठा. तो इतका कमी आहे की थोडी जरी आयात वाढली तरी गंभीर प्रश्न निर्माण होतो ! शिवाय ठराविक वेळी किती परदेशी चलन लागेल याचा आढावा नि त्यावेळेस ते मिळण्याबद्दलचे आडाखे यांचा मेळ बसत नाही. शिवाय काही ठराविक उद्योगधंद्यांकरिता ठराविक प्रकारचीच आयात करावी लागते नि त्यामुळे परदेशी मदत उपलब्ध असूनसुद्धा त्या ठराविक प्रकारच्या आयातीसाठी नवीन कर्जाच्या शोधार्थ जावे लागते. सरकारला योग्य प्रकारे या सर्व गोष्टींचा मेळ घालता आला पाहिजे. हे जमल्यासच वेळोवेळी उद्भवणारे परदेशी चलनाच्या चणचणीचे प्रश्न निर्माण होणार नाहीत. तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या सुरुवातीलाच आपल्याला या प्रश्नांना तोंड द्यावे लागणारसे दिसते. उपलब्ध परदेशी मदतीत बसेल अशी योजना पुन्हा आखावी असे मत मांडले जाते. काहीकाही वेळेला तर सर्वसाधारण लोकांना असेही वाटू लागते की आपण सर्वस्वी परदेशी मदतीवर तर अवलंबून नाही ना ? पण हे सर्व काही खरे नाही. आपण परदेशी मदत बऱ्याच प्रमाणात स्वीकारीत असलो तरी आपल्या गुंतविलेल्या भांडवलाचा तो एक लहानसा हिस्सा आहे.

## आंतरराष्ट्रीय घटनांची प्रतिक्रिया

अलीकडे अलीकडे एक गोष्ट मात्र अतिशय प्रकर्षाने जाणवते. ती म्हणजे परदेशी मदत अनेक राज-कीय गोष्टी नि घटनांशी निगडित असते. भारताने आतापर्यंत स्वीकारलेल्या परदेशी मदतीच्या बाबतीत जरी कुठल्याही प्रकारची राजकीय स्वरूपाची बंधने निगडीत नसली तरी काही राजकीय बाबींचा प्रभाव येथेही आहे हे नाकबूल करता येणार नाही. सुरवाती-पासूनच कम्युनिझमचा प्रसार थोपविण्यासाठी परदेशी मदतीचा उपयोग केला गेला. रशियाच्या या क्षेत्रातील पदक्षेपाबरोबरच जागतिक शीतयुद्धातील ते एक महत्त्वाचे अस्त्र होऊन बसले. यामुळेच परदेशी मदती-भोवती एकप्रकारचे अशाश्वतीचे वलय अस्तित्वात असते. आपल्या परराष्ट्रीय धोरणामुळे तर हे जास्तच जाणवते. धनको राष्ट्रात अमेरिकेचे स्थान सर्वप्रथम आहे. आपल्या परराष्ट्रीय धोरणामुळे त्या देशात उमटणाऱ्या पडसादांचा परिणाम केवळ त्या देशाकडून












मिळणाऱ्या मदतीपुरताच मर्यादित न राहता इतर युरोपियन राष्ट्रांवरसुद्धा होतो. 'एड इंडिया क्लबच्या' एकूण कारकीर्दीवरून सुद्धा याची प्रचीती येते. जोरदार आर्थिक विकास साधण्यासाठी पूर्वनियोजित परदेशी मदत सतत मिळाली पाहिजे. पण अशा प्रकारे परदेशी मदत मिळविण्यात अनेक अडचणी आल्यामुळेच मग दुसरे मार्ग शोधावे लागतात. सध्या जास्त प्रमाणात व जास्त प्रचारात असलेला दुसरा मार्ग म्हणजे भारतीय नि परदेशी कंपन्यांच्या सहकार्याने उद्योगधंद्यांची वाढ करणे व त्यायोगे खाजगी परदेशी भांडवलाची आयात करणे. या मार्गाचा एक मोठा फायदा म्हणजे सरकारला कर्जफेडीचा प्रश्न सतावीत नाही. सध्या अशा प्रकारच्या ८१ कंपन्यांना मान्यता देण्यात आली आहे. यामुळे आपल्या योजनेबरहुकूम उद्योगधंद्यांत भांडवल तर गुंतविले जाईलच, पण त्याकरिता आवश्यक असणारी आयात पण विनासायास होईल. शिवाय आपल्या योजना नीट आखून नि त्याप्रमाणे इतर राष्ट्रांची नि जागतिक संस्थांची मदत घेतल्यास हा प्रश्न वाटतो तितका कठीण भासणार नाही.

## स्वावलंबन हे ध्येय

जसजशी राष्ट्राची आर्थिक नि औद्योगिक प्रगती होत जाईल तसतशी परदेशी मदतीची जरूरी कमी करत आणली पाहिजे. सतत परदेशी भांडवलाची आयात करीत राहिल्यास देशांतर्गत अर्थव्यवस्थेत अनेक दुष्परिणाम होण्याची शक्यता आहे. कुठल्याही प्रकारचे निर्बंध नसलेला परराष्ट्रीय व्यापार हा जरी आपला आदर्श असला तरी आपण देशातील जास्तीतजास्त उपलब्ध साधनांचाच उपयोग करण्यास शिकले पाहिजे. आयात कमी केली पाहिजे नि निर्यात वाढविण्याचे आटोकाट प्रयत्न केले पाहिजेत. कारण आतापर्यंत घेतलेली कर्जे फेडण्याकरताच दिवसेदिवस आपल्याला जास्त जास्त परदेशी चलनाची आवश्यकता भासू लागेल.

प्रथम आपण आयातीत कितपत कपात करता येईल ते पाहू. सध्या आयातीवर इतके कडक निर्बंध आहेत की त्यांचे प्रमाण याहून जास्त वाढविल्यास आपल्या अर्थव्यवस्थेतच अधिक भानगडी निर्माण होण्याची शक्यता आहे. पण म्हणून काही असे प्रयत्न सपशेल सोडून द्यावेत असे नाही. थोड्याशा वर्षांनी या मार्गाचा अवलंब करता येईलही. कारण आता आपण ज्या वस्तूंची आयात करतो त्या वस्तू भारतातच निर्माण करता येतील अशा उद्योगधंद्यांना अग्रहक्क दिल्यास आयातीत कपात करता येईल. याशिवाय शेतीउत्पादनात पण वाढ होणे जरूर आहे, त्यामुळे अन्नधान्यांच्या बाबतीत स्वयंपूर्णता तर मिळेलच, पण शिवाय निर्यातही वाढेल, याकरिताच पंचवार्षिक योजनात पैसा गुंतवितानाच आयातीत कपात करावयाच्या या ध्येयावर दृष्टि ठेवूनच त्याबरहुकूम योजना आखाव्या लागतील.

## आयात-निर्यातीचा मेळ

निर्यातवाढ करावयाची असेल तर मुख्य गोष्ट म्हणजे आपण औद्योगिक क्षेत्रातील कार्यक्षमता वाढविण्यासाठी झटले पाहिजे. सरासरी उत्पादनखर्च शक्य तितका करण्याकडे जास्त लक्ष पुरविले पाहिजे. पण हे करताना योजावयाचे उपाय मात्र काळजीपूर्वक योजले पाहिजेत. बेकारांच्या संख्येत यामुळे भर पडता कामा नये. नाहीतर करायला गेलो एक आणि झाले भलतेच असे व्हायचे ! शिवाय दुसरी एक अडचण म्हणजे देशी बाजारपेठांतून भरपूर नफा मिळत असल्यामुळे सरासरी उत्पादनखर्च पण कमी करण्याची फारशी तीव्र इच्छा आढळून येत नाही. वाढती मागणी, त्यामुळे उत्तरोत्तर वाढत जाणाऱ्या किंमती, नि भरपूर नफा, अशा प्रकारच्या वातावरणात निर्यातवाढ करणे हे महाबिकट नि जवळजवळ अशक्यप्रायच काम म्हटले पाहिजे ! ते ध्येय साध्य करावयाचे असेल तर त्याकरिता अतिशय उत्कट इच्छाशक्ति नि अविरत प्रयत्न यांची शिदोरी असल्याशिवाय पाऊल पुढे टाकता येणार नाही. नाहीतर मग सरकारला एकतर सक्तीने निर्यात करावयास लावावी लागेल किंवा द्रव्यसाहाय्य तरी द्यावे लागेल. भारतात सध्या अस्तित्वात असलेली एक स्तुत्य पद्धति म्हणजे ठराविक निर्यात करणाऱ्यास आयातीचे परवाने देणे. युरोपच्या सामुदायिक बाजारपेठेच्या [ E. C. M. ] स्थापनेमुळे, व इंग्लंडसुद्धा त्यात सामील होण्याची शक्यता निर्माण झाल्यामुळे, भारताच्या निर्यातीवर काही अपकारक परिणाम होण्याचा संभव आहे. जागतिक बाजारपेठेत



अनुक्रमणिका






चढाओढ जरी वाढली तरी औद्योगिक क्षेत्राच्या सहकार्याने नि देशांतर्गत मागणीवर निर्बंध ठेवून निर्यात वाढविणे मात्र शक्य नाही असे नाही.

वरील विवेचनावरून एक गोष्ट मात्र सूर्यप्रकाशाइतकी स्वच्छ आहे असे दिसून येते. ती म्हणजे अल्पावधीत आयात कमी करणे नि निर्यात वाढवून आयातनिर्यातीचा सुसंगत मेळ बसविणे हे खडतर काम आहे. नि म्हणूनच आर्थिक प्रगतीला कुठल्याही प्रकारची झळ लागू न देता परराष्ट्रीय व्यापारात आयातनिर्यातीच्या बाबतीत समतोलपणा प्रस्थापित होईपर्यंत परदेशी मदत स्वीकारावीच लागेल. आर्थिक विकासाच्या मार्गावर तोंड द्याव्या लागणाऱ्या अडचणींना टाळून मार्ग काढावयाचा असेल तर त्याकरिता अविरत प्रयत्न करून योग्य वेळी योग्य प्रकारची नि योग्य त्या प्रमाणात परदेशी मदत मिळविता आली पाहिजेच पाहिजे.

---

### श्रद्धाविषयक मूल्ये

"लोकशाहीसमाज सुस्थित होण्यासाठी काहीतरी श्रद्धाविषयक मूल्ये असली पाहिजेत. नैतिक भाव असणे हे मोठ्या मनाचे लक्षण आहे. ज्याला कशाचाच आदर वाटत नाही त्याला त्यांच्या जीवनाबद्दलही अंततोगत्वा आदर वाटणार नाही. केवळ अफाट विचार प्रदर्शित करणे, विद्यमानावर प्रचंड आघात करणे, एवढ्याने कर्तृत्व संपते असा जो भाव आज समाजात दिसून येत आहे तो घातुक आहे. समाजाच्या प्रगतिसाठी विचार करणे हे साहित्याचे काम आहे. अमर्याद लेखनस्वातंत्र्य अगर अभिव्यक्तिस्वातंत्र्य समाजाने सहन केल्यास समाजाची प्रगति न होता समाज बाष्कळ व व्रात्य होतो. आदर्श चरित्र मग समाजांत मूळ धरत नाही."

— न. वि. गाडगीळ

[ मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपदावरून ]





अनुक्रमणिका








# राष्ट्राच्या संरक्षणासाठी

# नॅशनल डिफेन्स बॉण्ड्स १९७२



## विकत घ्या

द. द. रु. ४। दराचे. व्याज दर सहा महिन्यांनी दिले जाईल,
रु. १०० च्या पटींच्या किमतीत उपलब्ध.
१० नोव्हेंबर १९७२ रोजी पूर्ण किंमत परत केली जाईल.

ते विकत घेण्यासाठी खालील ठिकाणीं अर्ज मिळतील :
रिझर्व्ह बँक ऑफ इंडियाच्या सर्व कचेऱ्या,
स्टेट बँक ऑफ इंडियाच्या सर्व शाखा व
तिच्या कक्षेतील सर्व दुय्यम बँका.

भारत सरकारचे

**४। टक्के दराचे नॅशनल डिफेन्स बॉण्ड्स १९७२**



अनुक्रमणिका








प्रा. मे. पुं. रेगे

# ॲरिस्टॉटलचे संविधानशास्त्र : ४ :

## ५. आकृत्यंतरण

अपूर्ण संविधानांचे आकृत्यंतरण करण्यासाठी ( म्हणजे अपूर्ण संविधानांचे सत्य सिद्ध करण्यासाठी ) ॲरिस्टॉटलने अनेक प्रकारच्या सिद्धींचा ( proofs ) उपयोग केला आहे. त्यापैकी सर्वात सुगम, सरळ सिद्धिप्रकारामध्ये मूळ ( अपूर्ण ) संविधानांची पक्षविधाने ( premisses ) घेतली जातात. त्यापैकी एकाचे किंवा दोहोंचेही परिवर्तन करण्यात येते आणि अशा रीतीने उपलब्ध झालेल्या विधानांच्या आधारावर ते अपूर्ण संविधान सिद्ध करण्यात येते. संविधानांचे आकृत्यंतरण करताना ॲरिस्टॉटलने ह्याच सिद्धिप्रकाराचा प्रामुख्याने उपयोग केला आहे. ह्या रीतीने ज्याचे आकृत्यंतरण करण्यात आले आहे अशा एखाद्या संविधानाच्या सिद्धीचे तार्किक विश्लेषण जर आपण केले तर ह्या सिद्धिप्रकाराचे सामान्य स्वरूप आपल्या ध्यानात येईल.

उदाहरणादाखल, ' दिसामिस् ' ह्या संविधानाचे आकृत्यंतरण घेऊ या. दिसामिस् हे संविधान असे आहे :

जर क काही खच्या अंगी आहे आणि ग सर्व खच्या अंगी आहे तर क काही गच्या अंगी आहे (१)

ह्या संविधानाची सिद्धि दारिइ ह्या संविधानावर आधारलेली आहे. दारिइ असे मांडता येईल :

जर ग सर्व खच्या अंगी आहे आणि ख काही कच्या अंगी आहे तर ग काही कच्या अंगी आहे (२)

प्रथम आपण दिसामिस्च्या सिद्धीचे स्वरूप ' अनौपचारिकतेने ( informally ) समजावून घेऊ आणि मग ही सिद्धि तर्कशुद्ध स्वरूपात मांडू –

दिसामिस् सिद्ध करणे म्हणजे

' क काही खच्या अंगी आहे ' (३)

आणि ' ग सर्व खच्या अंगी आहे ' (४)

ही विधाने खरी असतील तर

' क काही गच्या अंगी आहे ' (५)

हे विधानही खरे असते, हे दाखविणे. आता, जेव्हा–

' ग सर्व खच्या अंगी आहे ' (६)

आणि ' ख काही क च्या अंगी आहे ' (७)

ही विधाने जेव्हा खरी असतात, तेव्हा

' ग काही क च्या अंगी आहे ' (८)

हे विधान खरे असतेच. कारण (६) आणि (७) पासून (८) हे विधान दारिइ ह्या अनुमान रूपाला अनुसरून निष्पन्न होते आणि दारिइ हे एक पूर्ण संविधान आहे. आता (८) पासून (५) हे आपले इष्ट विधान, – दिसामिस्चा ' निष्कर्ष ' – परिवर्तनाने प्राप्त होते. तेव्हा (६) आणि (७) ही विधाने जेव्हा खरी असतात तेव्हा (५) हे विधानही खरे असते. असे पहा की दिसामिस्चे (४) हे पक्षविधान म्हणजेच दारिइचे (६) हे पक्षविधान; आणि दिसामिसच्या (३) ह्या पक्षविधानापासून दारिइचे (७) हे पक्षविधान परिवर्तनाने निष्पन्न होते. तेव्हा दिसामिस्च्या (३) आणि (४) ह्या पक्षविधानांपासून दारिइची (६) आणि (७) ही पक्षविधाने प्राप्त होतात; (६) आणि (७) पासून (८) हे विधान आवश्यकतेने निष्पन्न होते – कारण, दारिइ हे एक पूर्ण संविधान आहे – आणि (८) पासून परिवर्तनाने (५) हे म्हणजे दिसामिस्चे इष्ट निष्कर्षविधान – प्राप्त होते. म्हणजे दिसामिस्च्या (३) आणि (४) ह्या पक्षविधानांपासून परंपरेने त्याचे (५) हे निष्कर्षविधानही प्राप्त होते. आपल्याला हेच दाखवून द्यायचे होते.

आता ही सिद्धि तर्कशुद्ध रीतीने मांडायची ह्यासाठी पुढील विधान-रूपाचा आश्रय घ्यावा लागेल –

जर ( जर र तर ल ) तर ( जर [ स आणि र ] तर [ स आणि ल ] ) (९)

–[ ह्या विधानरूपाला ' अवयव तत्त्व ' – principle of the factor – असे म्हणतात. अनौपचारिकतेने ह्याचा अर्थ असा लावतां येईल की जर र पासून ल








निष्पन्न होत असेल तर, जर स आणि र ही विधाने खरी असतील तर स आणि ल ही विधाने पण खरी असली पाहिजेत. ] आता 'र' च्या ठिकाणी 'क काही ख च्या अंगी आहे' ह्या विधानाची योजना करा; त्याचप्रमाणे 'ल' च्या ठिकाणी 'ख कांही कच्या अंगी आहे' ह्या विधानाची योजना करा आणि 'स' च्या ठिकाणी 'ग सर्व खच्या अंगी आहे' ह्या विधानाची योजना करा. म्हणजे ( ९ ) पासून पुढील विधान निष्पन्न होते.

जर ( जर क काही खच्या अंगी आहे तर ख काही कच्या अंगी आहे ) तर ( जर ग सर्व खच्या अंगी आहे आणि क काही खच्या अंगी आहे तर ग सर्व खच्या अंगी आहे आणि ख काही कच्या अंगी आहे. ) (१०)

– आता ( १० ) चे पूर्वांग म्हणजे :

जर क काही खच्या अंगी आहे तर ख काही कच्या अंगी आहे. (११)

आणि ( ११ ) म्हणजे परिवर्तन नियम होय. हा नियम आपले एक आदिविधान आहे. तेव्हा तो मान्य केलाच पाहिजे. तेव्हा (१०) आणि (११) पासून 'विधि उपसंघाता' नुसार ( Modus Ponens ) (११) चे उत्तरांग निष्पन्न होते. ते असे :

जर ( ग सर्व ख च्या अंगी आहे आणि क काही खच्या अंगी आहे ) तर ( ग सर्व खच्या अंगी आहे आणि ख काही कच्या अंगी आहे ) ( १२ )

आता पुढील विधान–रूप पहा.

जर ( जर र तर ल ) तर ( जर ल तर स ) तर ( जर र तर स ) ( १३ )

[ हे विधान–रूप म्हणजे सोपाधिक संविधानाचा नियम ]

आता ( १३ ) मध्ये 'र' बद्दल 'ग सर्व खच्या अंगी आहे आणि क काही खच्या अंगी आहे' ह्या विधानाची, 'ल' बद्दल 'ग सर्व खच्या अंगी आहे आणि ख काही कच्या अंगी आहे' ह्या विधानाची आणि 'स' बद्दल 'ग काही कच्या अंगी आहे' ह्या विधानाची योजना केली तर ( १३ ) पासून पुढील विधान निष्पन्न होते –

जर ( जर ग सर्व खच्या अंगी आहे आणि क काही खच्या अंगी आहे तर ग सर्व खच्या अंगी आहे आणि ख काही कच्या अंगी आहे ) तर [ जर ( जर ग सर्व खच्या अंगी आहे आणि ख काही कच्या अंगी आहे तर ग काही कच्या अंगी आहे ) तर ( जर ग सर्व खच्या अंगी आहे आणि क काही खच्या अंगी आहे तर ग काही कच्या अंगी आहे ) ] ( १४ )

आता ( १४ ) चे पूर्वांग म्हणजे वर सिद्ध केलेले ( १२ ) हे विधान. तेव्हा ( १४ ) आणि ( १२ ) पासून विधिसंघातानुसार ( १४ ) चे वर अधोरेखित केलेले उत्तरांग निष्पन्न होते, त्याला ( १५ ) म्हणू या.

–आता (१५) हे व्यंजक विधान आहे व त्याचे पूर्वांग ऊर्ध्वरेखित असे म्हणजे दारिइ हे संविधान –आपले आदिविधान– होय. म्हणजेच ( २ ) हे विधान होय. तेव्हा ( १५ ) व ( २ ) पासून विधिसंघातानुसार ( १५ ) चे उत्तरांग सिद्ध होते. ते असे :

जर ग सर्व खच्या अंगी आहे आणि क काही खच्या अंगी आहे तर ग काही कच्या अंगी आहे. ( १६ )

आतां पुढील विधान घ्या.

जर ( जर ग सर्व खच्या अंगी आहे. आणि क काही खच्या अंगी आहे तर ग काही कच्या अंगी आहे ) तर [ जर ( जर ग काही कच्या अंगी आहे तर क काही गच्या अंगी आहे ) तर ( जर ग सर्व खच्या अंगी आहे आणि क काही खच्या अंगी आहे तर क काही गच्या अंगी आहे. ) ] ( १७ )

–( १७ ) चे रूप हे सोपाधिक संविधानाचे आहे. त्याचे पूर्वांग म्हणजे वर सिद्ध केलेले ( १६ ) हे विधान. तेव्हा ( १७ ) व ( १६ ) पासून विधि-संघातानुसार ( १७ ) चे वरील अधोरेखित उत्तरांग निष्पन्न होते, त्याला ( १८ ) म्हणू या. ( १८ ) चे पूर्वांग ( ऊर्ध्वरेखित असे ) म्हणजे परिवतन–नियम –आपले एक आदिविधान– होय. त्याला ( १९ ) म्हणू. –( १८ ) व ( १९ ) पासून विधिसंघाताने पुढील सिद्ध होते.

जर ग सर्व खच्या अंगी आहे आणि क काही खच्या अंगी आहे तर क काही गच्या अंगी आहे. ( २० )








आतां, पुढील विधान-रूप प्रमाण आहे :

जर र आणि ल तर ल आणि र (२१)

–(२१) मध्ये 'र' बद्दल 'क काही खच्या अंगी आहे' आणि 'ल' बद्दल 'ग सर्व खच्या अंगी आहे' ही विधानरूपे योजिली तर पुढील विधान–रूप निष्पन्न होते :

जर क काही खच्या अंगी आहे. आणि ग सर्व खच्या अंगी आहे तर ग सर्व खच्या अंगी आहे आणि क काही खच्या अंगी आहे. (२२)

आता पुढील विधान–रूप घ्या.

जर [ जर क काही खच्या अंगी आहे. आणि ग सर्व खच्या अंगी आहे तर ग सर्व खच्या अंगी आहे आणि क काही खच्या अंगी आहे ] तर [ **जर ( जर ग सर्व खच्या अंगी आहे आणि क काही खच्या अंगी आहे तर क काही गच्या अंगी आहे ) तर ( जर क काही खच्या अंगी आहे आणि ग सर्व खच्या अंगी आहे तर क काही गच्या अंगी आहे )** ] (२३)

आता (२३) चे रूप हे सोपाधिक संविधानाचे रूप होय. तेव्हा ते खरे आहे. त्याचे पूर्वांग म्हणजे वर सिद्ध केलेले (२२) हे विधान. तेव्हा (२३) आणि (२२) पासून विधिसंघातानुसार (२३) चे अधो-रेखित उत्तरांग सिद्ध होते. त्याला (२४) म्हणू या. पण (२४) हे एक व्यंजक विधान आहे. त्याचे पूर्वांग– ऊर्ध्वरेखित असे म्हणजे वर सिद्ध केलेले (२०) हे विधान होय. तेव्हा (२४) आणि (२०) पासून विधिसंघाताने (२४) चे उत्तरांग सिद्ध होते. आणि हे उत्तरांग म्हणजे :

जर क काही खच्या अंगी आहे आणि ग सर्व खच्या अंगी आहे तर क काही गच्या अंगी आहे. (२५)

(२५) हे विधान म्हणजे आपले इष्ट संविधान दिसामिस् होय.

दिसामिस्च्या ह्या सिद्धीमध्ये आपण विधानांच्या तर्कशास्त्रातील– विधानगणितात सिद्ध करण्यात येणाऱ्या पुढील विधान-रूपांचा उपयोग केला आहे.

जर (जर र तर ल) तर [जर (जर ल तर स) तर (जर र तर स)] जर (जर र तर ल) तर (जर स आणि र तर स आणि ल) जर (र आणि ल) तर (ल आणि र)

त्याचप्रमाणे आदिविधाने म्हणून परिवर्तनाचा नियम आणि दारिइ हे पूर्ण संविधान ह्यांचा उपयोग केला आहे. ही दोन्ही पदांच्या तर्कशास्त्रातील तार्किक विधान– रूपे आहेत. विधिसंघाताचा नियम आणि आदेश नियम ( Law of substitution ) हे दोन अनुमाननियम आधाराला घेतले आहेत. आदेशनियम 'अनौपचारिकतेने' असा मांडता येईल : चरचिन्हे आणि विधानसंयोजके ह्यांचे मिळून बनलेले संयुक्त विधान–रूप घ्या. अशा विधानरूपातील चरचिन्हांच्या अक्षरांच्या बदली विधानांची योजना करता येते. असे एखादे संयुक्त विधान–रूप जर प्रमाण असेल तर त्यातील चरचिन्हांच्या ऐवजी विधाने योजून प्राप्त होणारे विधानही प्रमाण असते. बारोको आणि बोकार्दो ही दोन संविधाने सोडली तर इतर सर्व अपूर्ण संवि-धानाचे आकृत्यंतरण वरील तत्त्वांच्या साहाय्याने – म्हणजे पूर्ण संविधाने व परिवर्तन नियम ही आदि-विधाने, सोपाधिक संविधान आणि अवयव–तत्त्वे ही तीन विधान-रूपे ह्यांच्यापासून आणि विधि-संघातनियम आणि आदेशनियम ह्या दोन नियमांना अनुसरून करता येते. वर उल्लेखिलेल्या अवयवतत्त्वा-तील एक तत्त्व म्हणजे वर उपयोगात आणलेले (९) हे विधान. दुसरे अवयव तत्त्व असे :

जर (जर र तर ल) तर (जर र आणि स तर ल आणि स) (२६)

## ६. अनिष्टापत्त्या आकृत्यंतरण

– ( Reduction ad impossible )

बारोको व बोकार्दो ह्या संविधानांचे परिवर्तनाच्या साहाय्याने आकृत्यंतरण करता येत नाही, त्यांचे आकृ-त्यंतरण करण्यासाठी ॲरिस्टॉटल दुसरीच एक रीत वापरतो; ह्या सिद्धिप्रकाराला तो अनिष्टापत्त्या आकृ-त्यंतरण असे नांव देतो. बारोकोची ॲरिस्टॉटलने दिलेली सिद्धि अशी : "जर ख सर्व गच्या अंगी आहे पण काही कच्या अंगी नाही तर असे असणे आवश्यक आहे की ग काही कच्या अंगी नाही. कारण जर ग सर्व कच्या अंगी असेल तर ज्या अर्थी खचे सर्व गला उद्देशून आधीच विधेयन करण्यात आले

आहे - त्या अर्थी ख सर्व क च्या अंगी असणार. पण ख कांही क च्या अंगी नाही हे गृहीत धरलेले आहे. " ( An. pr. i. 5, 27ª37 ) ही सिद्धि अत्यंत त्रोटक स्वरूपात मांडण्यात आली आहे खरी पण सर्वसाधारणपणे तिचा अर्थ लावण्यात येतो तो असा :

ख सर्व ग च्या अंगी आहे. ( १ )

आणि ख काही क च्या अंगी नाही ( २ )

ही दोन्ही विधाने पक्षविधाने म्हणून खरी आहेत असे समजा. मग

ग काही क च्या अंगी नाही ( ३ )

- हे विधान खरे असलेच पाहिजे. कारण, समजा, ( ३ ) खोटे आहे. मग त्याचे व्याघाती विधान -

ग सर्व क च्या अंगी आहे ( ४ )

- खरे असले पाहिजे. कारण ( १ ) व ( ४ ) पासून बार्बारा ह्या संविधानानुसार -

ख सर्व क च्या अंगी आहे ( ५ )

हे विधान सिद्ध होते. ( जर ख सर्व ग च्या अंगी आहे आणि ग सर्व कच्या अंगी आहे तर ख सर्व कच्या अंगी आहे. ) पण ( ५ ) खरे असणे शक्य नाही. कारण ( २ ) खरे आहे आणि ( ५ ) हे ( २ ) चे व्याघाती विधान आहे. तेव्हा 'ग सर्व कच्या अंगी आहे' हे जे विधान आपण खरे मानले आहे आणि ज्यापासून ( ५ ) हे खोटे असलेले विधान निष्पन्न होते ते वास्तविक खोटे असले पाहिजे. म्हणजे, त्याचे व्याघाती विधान

ग काही कच्या अंगी नाही- वरील (३) हे विधान हे खरे असले पाहिजे. सारांश, बारोकोच्या ( १ ) व ( २ ) ह्या पक्षविधानांपासून त्याचे ( ३ ) हे निष्कर्ष-विधान निष्पन्न होते.

पण आतां ह्या सिद्धीने काय सिद्ध केले आहे ? बारोकोकडे एक अनुमान-नियम म्हणून जर आपण पाहिले तर त्याचे प्रामाण्य ह्या सिद्धीने सिद्ध करण्यात आले आहे हे स्वीकारता येईल. म्हणजे, बारोकोची पक्षविधाने जेव्हा खरी असतात - वरील ( १ ) आणि ( २ ) ही विधाने - तेव्हा त्याचे निष्कर्षविधानही खरे असतेच, - वरील ( ३ ) हे विधान खरे असतेच - हे वरील सिद्धीने दाखवून दिले आहे. पण ॲरिस्टॉटलचे बारोको हे संविधान म्हणजे एक अनुमान- नियम नाही. ते एक व्यंजक विधान आहे. वरील सिद्धीने कोणत्याही व्यंजक विधानाचे सत्य सिद्ध करण्यात आलेले नाही हे उघड आहे. ह्या सिद्धीवर दुसराही एक आक्षेप घेता येईल. अनिष्टापत्त्या सिद्धीची ॲरिस्टॉटलने जी व्याख्या दिली आहे ती लक्षात घेतली तर बारोकोची वर दिलेली सिद्धि त्या प्रकारात मोडत नाही हे सहज लक्षात येईल. ॲरिस्टॉटल प्रत्यक्ष सिद्धि आणि अप्रत्यक्ष (indirect) किंवा अनिष्टापत्त्या सिद्धि ह्यांच्यात भेद करतो. ह्या भेदाचे स्वरूप त्याने अशा रीतीने स्पष्ट केले आहे : प्रत्यक्ष सिद्धीची सुरवात सत्य म्हणून स्वीकारलेल्या विधानापासून होते. उलट, अप्रत्यक्ष किंवा अनिष्टापत्त्या सिद्धि ज्या विधानाचे तिला खंडन करायचे असते त्याच्याच ( तात्पुरत्या ) स्वीकारावर आधारलेली असते; म्हणजे त्या विधानापासून एखाद्या उघड उघड खोट्या असलेल्या विधानाची निष्पत्ति करून त्या विधानाचे ती खंडन करते. ( An. pr. ii. 14 62ᵇ29 ) ह्याचा अर्थ असा की एखादे विधान जर आपल्याला अप्रत्यक्ष रीत्या किंवा अनिष्टापत्त्या सिद्ध करायचे असेल तर त्या विधानाच्या नाकारी ( negative ) विधानापासून किंवा व्याघाती विधानापासून आपल्याला सुरवात केली पाहिजे आणि त्याच्यापासून एखादे उघडउघड खोटे असलेले विधान निष्पन्न होते हे दाखविले पाहिजे. तेव्हा बारोकोची जर अप्रत्यक्ष सिद्धि करायची असेल तर बारोकोच्या नाकारी विधानापासून एखादे खोटे विधान निष्पन्न होते हे दाखवून दिले पाहिजे. ॲरिस्टॉटलने आपल्या सिद्धीची सुरवात बारोकोच्या नाकारी विधानापासून केलेली नाही, तर बारोकोच्या निष्कर्षाच्या नाकारी विधानापासून केली आहे; आणि त्याने त्यापासून एखादे उघडउघड खोटे असलेले विधान निष्पन्न करून दाखविले आहे असेही म्हणता येणार नाही. त्याने जे विधान निष्पन्न करून दाखविले आहे ते केवळ बारोकोच्या पक्षविधानाशी विसंगत असलेले विधान आहे. बारोकोची पक्ष-विधाने खरी असतील तर हे विधान खोटे ठरेल. पण ते निरपेक्षपणे खोटे- उघड उघड खोटे- असणारे विधान आहे असे म्हणता येणार नाही. तेव्हा बारोकोची वर दिलेली अप्रत्यक्ष सिद्धि ॲरिस्टॉटलच्या अनिष्टापत्त्या सिद्धीच्या व्याख्येला अनुसरून नाही हे उघड आहे.










अनुक्रमणिका

बारोकोची अप्रत्यक्ष सिद्धि तर्कशुद्ध रीतीने मांडायची तर अशी मांडता येईल. मांडणीच्या सोयीसाठी पुढील चिन्हांचा उपयोग करू. एखाद्या विधानाचे नाकारी विधान व्यक्त करण्यासाठी त्या विधानाच्या मागे एक रेघ काढू या. उदा. 'र' चे नाकारी विधान '–र' असे लिहिले जाईल. त्याचप्रमाणे

'र' ह्या चिन्हाने 'ख सर्व गच्या अंगी आहे'

'ल' ह्या चिन्हाने 'ख सर्व कच्या अंगी आहे'

आणि 'स' ह्या चिन्हाने 'ग सर्व कच्या अंगी आहे' अशी विधाने व्यक्त होतात असे समजू या. मग

'–ल' (किंवा 'न–ल') म्हणजे 'ख काही कच्या अंगी नाही' आणि '–स' (किंवा 'न-स') म्हणजे 'ग काही कच्या अंगी नाही'. आता एखादे व्यंजक विधान, 'जर र तर ल' ह्या रूपाचे विधान, जेव्हा आपण नाकारतो तेव्हा मूळ विधानाचे जे नाकारी विधान उपलब्ध होते ते म्हणजे 'र आणि न–ल'. ही गोष्ट पटवून घेण्यासाठी असा विचार करता येईल. 'जर र तर ल' ह्या विधानात जेव्हा 'र' खरे असते तेव्हा 'ल' खरे असते असे सांगितलेले असते. तेव्हा ही गोष्ट नाकारायची तर 'र' खरे आहे तरी पण 'ल' खरे नाही (म्हणजे 'न–ल' खरे आहे) असे म्हटले पाहिजे. म्हणजे 'र आणि न-ल' असे विधान केले पाहिजे. बारोकोची अप्रत्यक्ष सिद्धि मांडायला एवढी पूर्वपीठिका पुरेशी आहे.

ह्या अप्रत्यक्ष सिद्धीची रीत म्हणजे बारोकोच्या नाकारी विधानापासून एखाद्या त्याज्य, निरपेक्षपणे खोट्या विधानाची, निष्पत्ति करून दाखविणे. आता बारोकोचे नाकारी विधान म्हणजे :

––[जर (ख सर्व गच्या अंगी आहे आणि ख काही कच्या अंगी नाही) तर ग काही कच्या अंगी नाही] (६)

आपण स्वीकारलेल्या चिन्हांनुसार (६) असे मांडता येईल :

––[जर (र आणि न-ल) तर न-स] (७)

शिवाय वर केलेले विवेचन लक्षात घेता (७) असे मांडता येईल :

(र आणि न-ल) आणि –(न-स) (८)

आता '–(न-स)' किंवा 'न–न–स') म्हणजेच 'स'. तेव्हा (८) असे लिहिता येईल :

र आणि न–ल आणि स (९)

तेव्हा, बारोकोचे नाकारी विधान म्हणजे (९) होय. (९) पासून

न–ल (१०)

सिद्ध होते. आणि त्याचप्रमाणे (९) पासून

(र आणि स) (११)

हे विधानहि सिद्ध होते. पण

(र आणि स) तर ल (१२)

(१२) हे विधान म्हणजे बार्बारा हे आपले आदिविधान होय. ('र', 'स' आणि 'ल' ह्या चिन्हांनी निर्दिष्ट होणारी विधाने लक्षात घेता हे दिसून येईल.) (१२) व (११) पासून विधिसंघातानुसार

ल (१३)

सिद्ध होते. सारांश (९) ह्या बारोकोच्या नाकारी विधानापासून

(ल आणि न-ल) [(१३) आणि (१०) मिळून] (१४)

हे विधान सिद्ध होते. (१४) हे विधान आत्मव्याघाती (self contradictory) आहे व म्हणून त्याज्य आहे. तेव्हा (९) हे विधानही खोटे असले पाहिजे. व म्हणून (९) चे व्याघाती विधान– बारोको हे संविधान– खरे असले पाहिजे. ही सिद्धि रूपात्मक रीतीने अशी मांडता येईल.

जर [–(जर (र आणि न – ल) तर न –स)]
तर (र आणि न–ल आणि स) (१५)

जर (र आणि स) तर ल (१६)

(१६) हे विधान म्हणजे बार्बारा होय. त्यापासून दुसऱ्या अवयवतत्त्वाचा उपयोग केला तर पुढील विधान निष्पन्न होते.

जर [जर (र आणि स) तर ल] तर [जर (र आणि स आणि न–ल) तर (ल आणि न – ल)] (१७)

आता, (१७) आणि (१६) पासून विधिसंघातानुसार खालील विधान सिद्ध होते.

जर (र आणि स आणि न-ल) तर (ल आणि न – ल) (१८)

आतां व्यत्यास-नियमाला अनुसरून पुढील विधान प्राप्त होते :



अनुक्रमणिका

जर [ जर ( र आणि स आणि न-ल ) तर ( ल आणि न-ल ) ] तर [ जर - ( ल आणि न-ल ) तर - ( र आणि स आणि न-ल ) ]     (१९)

(१९) आणि (१८) पासून विधिसंघातानुसार (१९) चे उत्तरांग, म्हणजे

जर - ( ल आणि न-ल ) तर - ( र आणि स आणि न-ल )     (२०)

- हे विधान सिद्ध होते. पण व्याघात-नियमानुसार

- ( ल आणि न-ल )     (२१)

तेव्हा (२१) आणि (२०) पासून विधिसंघातानुसार (२१) चे उत्तरांग

- ( र आणि स आणि न-ल )     (२२)

सिद्ध होते. ( २२ ) पुढे दिल्याप्रमाणे लिहिता येईल :

- ( र आणि न-ल आणि स )     (२३)

आता पुढील विधान व्यत्यास-नियमाला अनुसरून असल्यामुळे मान्य आहे :

जर [ जर- ( जर र आणि न-ल तर न-स ) तर ( र आणि न-ल आणि स ) ] तर [ जर- ( र आणि न-ल आणि स ) तर - ( - ( जर र आणि न-ल तर न-स ) ) ]     (२४)

आता ( २४ ) आणि ( १५ ) पासून विधिसंघाताने ( २४ ) चे उत्तरांग सिद्ध होते. ते म्हणजे :

जर [ - ( र आणि न-ल आणि स ) ] तर - [ - (जर र आणि न - ल तर न-स ) ] (२५)

पण ( २५ ) चे पूर्वांग म्हणजे वर सिद्ध केलेले (२३) होय. तेव्हा (२५) आणि (२३) पासून विधिसंघातानुसार

— [ - (जर र आणि न-ल तर न-स) ] (२६)

हे विधान सिद्ध होते. आणि ( २६ ) पासून -

जर र आणि न-ल तर न-स     (२७)

हे आपले इष्ट बारोको संविधान सिद्ध होते.

वास्तविक बार्बारापासून एका सरळ, सोप्या रीतीने बारोको हे संविधान निष्पन्न करता येते. त्यासाठी पुढील विधानरूपाचा आश्रय घ्यावा लागतो.

जर (जर र आणि ल तर स) तर ( जर र आणि न-स तर न-ल )     (२८)

ह्या रूपाला जटिल-व्यत्यास नियम म्हणू या. ह्या नियमाचा अर्थ सोपा आहे. जर कोणत्या तरी दोन विधानांपासून तिसरे विधान निष्पन्न होत असेल तर, जर हे तिसरे विधान खोटे असेल तर पहिली दोन्ही विधाने खरी असू शकणार नाहीत. विशेषतः त्यापैकी जर पहिले खरे असेल तर दुसरे खोटे असले पाहिजे. कारण असे की पहिले विधान खरे असल्यावर जर दुसरेही खरे असेल तर तिसरेही खरे ठरेल. पण तिसरे तर खरे नाही. तेव्हा पहिले विधान खरे असताना दुसरे विधान खरे असू शकणार नाही. आता

' र ' बद्दल ' ग सर्व खच्या अंगी आहे '

' ल ' बद्दल ' ख सर्व कच्या अंगी आहे '

आणि ' स ' बद्दल ' ग सर्व कच्या अंगी आहे '

-अशी योजना केली तर ( २८ ) चे पूर्वांग म्हणजे बार्बारा ठरते आणि उत्तरांग म्हणजे बारोको ठरते. (२८) आणि ( २८ ) चे पूर्वांग म्हणजे बार्बारा हे मान्य आदिविधान ह्यापासून विधिसंघातानुसार बारोको निष्पन्न होते.

ॲरिस्टॉटलला हा जटिल-व्यत्यास नियम ठाऊक होता. आणि बारोको आणि बोकार्दो ही संविधाने सिद्ध करण्यासाठी ह्या नियमांचा उपयोगही त्याने केला आहे. संविधानाच्या 'परिवर्तना' संबंधी त्याने जे विवेचन केले आहे त्यावरून ही गोष्ट दिसून येते. ( An. pr. ii 8-10 ) एखाद्या संविधानाच्या निष्कर्षाचे व्याघाती विधान घेऊन त्याचा त्या संविधानाच्या एका पक्षविधानाशी संयोग करायचा व अशा रीतीने संविधानाच्या दुसऱ्या पक्षविधानाचे खडन करायचे ह्या प्रक्रियेला ॲरिस्टॉटल संविधानाचे परिवर्तन ( conversion of a syllogism ) असे म्हणतो. " जर निष्कर्षाचे परिवर्तन करण्यात आले असेल आणि पक्षविधानांपैकी एक स्थिर असेल तर दुसऱ्या पक्षविधानाचा नाश होणे आवश्यक आहे. कारण, ते ( सुद्धा ) जर स्थिर राहिले तर ( मूळ ) निष्कर्ष सुद्धा स्थिर राहील.' असे ॲरिस्टॉटल म्हणतो. ( An. pr. ii 8 ) येथे ॲरिस्टॉटलने वर दिलेला व्यत्यासनियम मांडला आहे. त्याचा उपयोग करून बारोको व बोकार्दो ही संविधानेही त्याने सिद्ध केली आहेत. त्याच प्रकरणात तो पुढे म्हणतो, " अस्तित्वाची संविधान ( म्ह. बार्बारा ) घ्या आणि वर सांगितल्याप्रमाणे त्याचे परिवर्तन करा. मग जर ख सर्व कच्या अंगी नसेल पण सर्व गच्या अंगी असेल तर ग सर्व






कच्या अंगी नसणार. आणि जर ख सर्व कच्या अंगी नसेल पण ग सर्व कच्या अंगी असेल तर ख सर्व गच्या अंगी नसणार" ( An. pr ii 8, 59b28 ) ह्या ठिकाणी ॲरिस्टॉटलने बारोको व बोकार्दो ह्या संविधानांची सर्वात सोपी सिद्धि दिलेली आहे.

मग बारोको व बोकार्दो ही संविधाने सिद्ध करण्यासाठी ह्या तर्कशुद्ध रीतीचा उपयोग करण्याऐवजी ॲरिस्टॉटलने आपल्या 'अनिष्टापत्त्या आकृत्यंतरण' ह्या सदोष रीतीचा उपयोग का केला? ह्याचे कारण म्हणजे संविधान हे सिद्धीचे एकमेव साधन आहे ही त्याची तात्त्विक भूमिका. सर्व सिद्धि 'मध्यमपदा' मार्फत झाली पाहिजे. त्यामुळे विधानगणितातील अनेक प्रमाण अशा विधानरूपांचा त्याने सहजबुद्धीने जरी उपयोग केला असला तरी ह्या विधान-रूपांचे पद्धतशीर संशोधन त्याने केले नाही. कोणत्याही निगामी व्यवस्थेला आधारभूत असलेल्या अशा ह्या विधानगणिताचा विकास त्याने केला नाही. त्यामुळे संविधाने सिद्ध करताना त्याने स्वतःच वापरलेल्या सिद्धीमागील तार्किक नियमांचे स्वरूप व कार्य त्याच्या ध्यानात आले नाही. आपल्या 'पूर्वान्विक्षकी'च्या ( prior Analytics ) पहिल्या अध्यायाच्या शेवटी ॲरिस्टॉटलने सोपाधिक अनुमानरूपांचा परामर्श घेण्याचे ठरविले होते. ज्या विधानरूपांच्या आधारावर आपण संविधाने सिद्ध करतो ती विधान-रूपे व्यंजक ( implicative ) असतात. ह्या प्रकारच्या विधान-रूपांवर आधारलेल्या अनुमानांना ॲरिस्टॉटल सोपाधिक अनुमाने ( hypothetical arguments ) म्हणतो. तो म्हणतो, 'इतरही अनेक निष्कर्ष सोपाधिक विधानांच्या साहाय्याने ( with the help of a hypothesis ) काढण्यात येतो; त्याचा परामर्श आपण घेतला पाहिजे आणि त्यांचे स्वरूप रेखाटले पाहिजे. पुढे आपण ह्या ( सोपाधिक युक्तिवादातील ) भेद आणि त्यांची वेगवेगळ्या प्रकारची घडण ह्यांचे स्वरूप स्पष्ट करूं......" पण आपले हे वचन ॲरिस्टॉटलने कुठेच पाळले नाही.

विधानगणिताची रचना करून तिच्याद्वारे ह्या 'सोपाधिक युक्तिवादांना' व्यवस्थित रूप देण्याचे कार्य पहिल्याने स्टोइक तर्कशास्त्रज्ञांनी पार पाडले. उदा. आपल्या विधान-गणितात त्यांनी जटिल-व्यत्यास नियम सिद्ध केला आहे. तो असा : आपल्या व्यवस्थेचे आदि अनुमान-नियम म्हणून स्टोइक पुढील तीन सोपाधिक संविधाने स्वीकारतात.

जर र तर ल
पण र  (२९)
∴ ल

जर र तर ल
पण न-ल  (३०)
∴ न-र

-( र आणि ल )
पण र  (३१)
∴ न-ल

-(३१) हा अनुमान-नियम समजणे कठीण नाही. 'र' आणि 'ल' ही दोन्ही विधाने खरी आहेत हे जर नाकारले असेल आणि त्यापैकी एक स्वीकारले असेल तर दुसरे विधान नाकारले पाहिजे.

आतां, ह्या तीन अनुमान-नियमांपासून 'जटिल-व्यत्यास नियम स्टोइक असा सिद्ध करतात. :

जर ( र आणि ल ) तर स [ ( ३० ) ला अनुसरून ]  (३२)
न-स
∴ -( र आणि ल )

-( र आणि ल )
र  [ ( ३१ ) ला अनुसरून ](३३)
∴ न-ल

सारांश, 'जर ( र आणि ल ). तर' हे विधान जर दिलेले असेल आणि 'न-स' आणि 'र' ही विधानेही दिलेली असतील तर त्यापासून 'न-ल' हे विधान सिद्ध होते. म्हणजे

जर [ जर ( र आणि ल ) तर स ] तर [ जर ( र आणि न-स ) तर न-ल ]  ( ३४ )

-( ३४ ) हे विधान म्हणजेच जटिल-व्यत्यास नियम होय.



अनुक्रमणिका






प्रा. म. दा. साठे

# व्याकरणशास्त्राचे प्रयोजन

'यद्यपि बहु नाधीषे तथापि पठ पुत्र व्याकरणम्।
स्वजनः श्वजनो मा भूत् सकलं शकलं सकृत् शकृत्।'
– सुभाषित

अर्थ– "अरे पुत्रा, जरी तू फार अध्ययन केले नाहीस तरीपण व्याकरणशास्त्राचे अध्ययन अवश्य कर. कारण 'स्वजन' शब्दाबद्दल 'श्वजन', 'सकल' बद्दल 'शकल' आणि 'सकृत्' बद्दल 'शकृत्' उच्चारण होऊ नये म्हणून."

दिवसेदिवस अभ्यासक्रमात व्याकरणाचे अध्ययन -अध्यापन कमी कमी होत चालले आहे, त्यामुळे शुद्ध-लेखनाचा मागमूसही दृष्टीस पडत नाही. प्रकाशकांकडे जे ग्रंथ प्रकाशनासाठी येतात किंवा वर्तमानपत्रांच्या नि मासिकांच्या संपादकांकडे जे लिखाण प्रसिद्धीसाठी येते ते इतके अशुद्ध असते की ते शुद्ध करण्यासाठी मुद्रितसंशोधकांचा ताफाच्या ताफा ठेवावा लागतो! बरे, या मुद्रितसंशोधकांना तरी व्याकरणाचे ज्ञान कोठे असते? म्हणून अगोदर त्यानाच शिक्षण द्यावे लागते! अलीकडे त्यांच्या शिक्षणासाठी पुण्यास वर्ग निघाला आहे. मराठी व्याकरणाचे शिक्षण, त्याचप्रमाणे शास्त्रशुद्ध शब्द कोणते व अपशब्द (अशुद्ध) कोणते हे शब्दांच्या व्युत्पत्तीसह शिकविण्यात येते. अलीकडे काही वर्तमान-पत्रातून इतके अशुद्ध असते की शाळेच्या प्रश्नपत्रिकेत 'शुद्ध करा' या शीर्षकाखाली त्यातील अनेक प्रयोग देण्यास हरकत नाही!

## भाषा व व्याकरण यांचा अन्योन्य संबंध

प्रथम भाषा की प्रथम व्याकरण हा प्रश्नच उद्भवत नाही. कारण कोणत्याही भाषेला परिणत स्वरूप आल्या-नंतरच वैयाकरण त्या भाषेतील नियमांचे संशोधन सुरू करतो. भाषा विकास पावते ती काही विशिष्ट नियमा-न्वयेच विकास पावते असा भाषाशास्त्रज्ञांचा दावा आहे. किंबहुना भाषा आणि तिचे व्याकरण एकसमया-वच्छेदे करून निर्माण होतात असे म्हणण्यास हरकत नाही. भाषेतील अनेक प्रयोग तपासल्यानंतर त्यामध्ये अनुस्यूत असलेले नियमांचे धागे-दोरे तो शोधू लागतो व ते सांपडल्यावर, त्या भाषेचे व्याकरण म्हणून लोकां-पुढे मांडतो. येथेच व्याकरणशास्त्राचा उगम आहे.

## संस्कृत व्याकरणाचा उगम व विकास

पण 'मूले कुठारः' या वचनाप्रमाणे येथे असा आक्षेप घेण्यात येतो की जर भाषेचा विकास काही विशिष्ट नियमांनीच होतो असे भाषाशास्त्र सांगते तर व्याकरणशास्त्राचे प्रयोजन काय? जर तिच्यात होणारे बदलही नियमबद्ध असतात तर व्याकरणाच्या नियमांनी तिला बांधून तिचा प्रवाह रोखून का धरावा? उलट भाषेच्या विकासाला व्याकरणाचे नियमच आड येतात! उच्चारानुसारी लेखन असावे असा सिद्धान्त मान्य केल्यानंतर मग शुद्धलेखनाच्या नियमांची यातायात कशाला? बोलणाऱ्याच्या मनातील अर्थ निःसंदिग्ध-पणे मांडणारे असे अर्थवाही लेखन असले म्हणजे झाले. पण उच्चारानुसारी लेखन म्हटल्यानंतर कोणाचे उच्चार हा प्रश्न येतोच. त्यावर शिष्टांचे उच्चारण असे सांगण्यात येते; कारण मनुष्यागणिक उच्चारण वेगळे असते. म्हणून **समाजात 'शिष्ट' असलेल्या** लोकांचे उच्चारण असे सांगण्यात येते. पण समाजात ज्यांना आपण 'शिष्ट' म्हणतो ते अल्पसंख्याक असतात. त्यांचे उच्चारण व त्याप्रमाणे लेखन बहुसंख्याक लोकांवर लादणे हे या लोकशाहीच्या युगात बरोबर दिसत नाही. 'लक्ष्मण' असा उच्चार न करता 'लक्षुमण' असा उच्चार करणारेच लोक बहुसंख्य असल्याने 'लक्षुमण' असेच लेखन शुद्ध समजावे असे डॉ. कालेलकर आवर्जून सांगतात! बरे, पुनः शिष्टाशिष्टांत तरी उच्चारण सारखे कोठे असते? महाराष्ट्रात जसे अनेक 'शिष्ट' आहेत तसे ते विदर्भात, मराठवाड्यात, मुंबई, नागपूर, सोलापूर इकडेही आहेत. पण या सर्व 'शिष्टां'चे उच्चारण सारखे कोठे असते? पुण्या-तील शिष्टांच्या उच्चारणाप्रमाणे लेखन नसावे असे विदर्भाकडील शिष्टांचे मत आहे म्हणून तर शुद्ध-लेखनाच्या नियमात एकवाक्यता दिसून येत नाही! तात्पर्य, 'शिष्टा'ची व्याख्या करणे सोपे काम नाही.









अनुक्रमणिका

कारण कोणालाही 'अशिष्ट' म्हणण्याची या काळात सोय नाही! महाभाष्यात 'शिष्ट' शब्दाची व्याख्या दिली आहे.[१]

### भाषेचा नियमबद्ध विकास

हे सर्व लक्षांत घेऊनही व्याकरणशास्त्र पाहिजे हा सिद्धान्त आहे. भाषेनंतर व्याकरण हे जरी खरे असले तरी एकदा त्या भाषेतील नियम समजावून घेतले म्हणजे पुढे तिचा विकास नियमबद्ध व्हावा, तिला रेखीव स्वरूप यावे, यासाठी त्या नियमांच्या चाकोरीतूनच तो होणे इष्ट ठरेल. व्याकरणाचे नियम अन्वाख्यानरूपाने असतात म्हणजे जे पाहिले ते सांगण्याचे असतात; त्यांना विधींचे स्वरूप येता उपयोगी नाही, असे कित्येकांचे मत आहे. पाणिनींने त्या काळी वैदिक आणि लौकिक भाषेत जे नियम पाहिले त्यांचे त्याने 'अन्वाख्यान' केले व ते विधिरूपाने मांडले. पाणिनीच्या सूत्रांचे अनेक प्रकार आहेत. त्यात विधिसूत्रे म्हणून एक प्रकार आहे. शब्दसिद्धीकरता प्रत्यय, आदेश, आगम, वर्णविकार वगैरे त्याने विधिसूत्रांनी सांगितले आहेत. नवीन शब्दप्रयोग करताना ती विधिसूत्रें लक्षात घेऊनच नवीन शब्द अगोदरच्या शब्दाप्रमाणे तयार करावेत असा त्याचा कटाक्ष आहे. नदीचा प्रवाह जसा रोखता येत नाही, फारतर आपल्या हितासाठी त्याला इष्ट दिशेकडे नेता येते, तसा भाषेचा ओघ व त्यातील बदल आपणास रोखता येत नसला तरी तो इष्ट दिशेने जावा यासाठी व्याकरणशास्त्राची आवश्यकता आहे. नदीला बंधारे घालूनही प्रवाह दिशा बदलून वाहतोच त्याप्रमाणे व्याकरणशास्त्राच्या नियमांना तुडवून भाषेचा ओघही मूळनियमांविरुद्ध बंड करून धिंगाणा घालतोच! त्याला वैयाकरण शरण जातो–त्याला जाणे भागच पडते. शेवटी 'प्रयोगशरणाः वैयाकरणाः' या सिद्धान्ताप्रमाणे त्याला नियमांतच बदल करावे लागतात! पाणिनीने आपल्या 'अष्टाध्यायी' व्याकरणाने भाषेला बांधल्यासारखे केले; नियमबद्ध करण्याचा प्रयत्न केला. पण तीनशे वर्षांनी पाणिनीच्या दृष्टीप्रमाणे तिच्यात अनेक अपशब्द (अशुद्ध शब्द) घुसले व मान्यताही पावले! त्यांना पुनीत करण्यासाठी वररुचि कात्यायनाने सूत्रसंख्येइतकी जरी नसली तरी अनेक वार्तिके रचिली. संस्कृत भाषा जिवंत होती तो पावेतो अशीच भर पुढील वैयाकरणांनी-पतंजलीने इष्टीच्या रूपाने घातली. संस्कृत भाषा बोलण्यातून लुप्त झाल्यानंतरच तिच्यात बदल झाले नाहीत व आता ती पूर्वनियमांनीच बद्ध असल्यामुळे तिला साचेबंद स्वरूप प्राप्त झाले आहे! त्यातूनही एखाद्या लेखकाने काही बदल केला तर त्यावर 'अपाणिनीय' असा शिक्का नसतो! उदाहरणार्थ, 'शालेय' रूप 'अपाणिनीय' असून ते 'शालीय' असे शुद्ध म्हणजे पाणिनीय पाहिजे असे आपले मत प्रस्तुत लेखकाने मागे 'केसरीत' मांडले, पण आता ते ऐकण्यास कोणी तयार नाही! कोणतीही जिवंत भाषा व्याकरण नियमांनी कायमची बांधली जात नाही हेच खरे. तरीपण व्याकरणाची आवश्यकता राहतेच हे वर दाखविलेच आहे.

### व्याकरणशास्त्राचा उगम

त्यामुळे व्याकरणाचा उगम फार प्राचीन कालापासून दिसतो. त्याचा इतिहास असा– तैत्तिरीय संहितेत देवांनी इंद्राला वाणीचे स्पष्टीकरण करण्याची विनंती केली. (तै. सं. कांड ६ प्रपाठक ४ अनुवाक ७) व इंद्राने स्पष्टीकरण केले अशी कथा आहे. "तस्मादेवमाह । वाग्वै पराच्यव्याकृताऽवदत्ते देवा इन्द्रमब्रुवन्निमां नो वाचं व्याकुर्विति । सोऽब्रवीत् वरं वृणै मह्यं चैवैष वायवे च सह गृह्याता इति। तस्मादैन्द्रवायवः सह गृह्यते । तामिन्द्रो मध्यतोऽवक्रम्य व्याकरोत् । तस्मादियं व्याकृता वागुद्यते ।"

प्रत्यक्ष 'व्याकरण' शब्द पाणिनीच्या अष्टाध्यायीतही नसून तो पतंजलीच्या महाभाष्यात[२] अनेक वेळा आलेला आहे. व्युत्पत्तीप्रमाणे त्याचा अर्थ 'शब्द

१. 'पृषोदरादीनि यथोपदिष्टम्'। ६।३।९ यावर व्याख्यान करताना पतंजलि महाभाष्यांत म्हणतो. 'के शिष्टाः । वे ब्राह्मणाः एतस्मिन् आर्यावर्ते कुम्भीधान्याः अलोलुपाः अगृह्यमाणकारणाः किंचिदन्तरेण कस्याश्चिद्विद्यायाः पारगाः तत्रभवता शिष्टाः'। म. भा. पान १७४ (लोभ न धरता विद्येच्या एखाद्या शाखेत पारंगत होणारे.)

२. 'व्याक्रियते अनेन व्याकरणम्।' किंवा 'सूत्रे व्याकरणे षष्ठ्यर्थोऽनुपपन्नः'। महाभाष्य, आ. १








स्पष्टीकरण विद्या ' असा आहे.[3] तरीपण त्याचा उगम तैत्तिरीय संहितेत व ब्राह्मणग्रंथांत मिळतो.[4] देवतांच्या स्वरूपाचे वर्णन ब्राह्मणग्रंथामध्ये अनेक वेळा देवतावाचक शब्दांच्या व्युत्पत्तीवरून केलेले पाहून त्यांच्या स्वरूपाची योग्य अशी व्युत्पत्ति करण्यास सुरुवात झाली व तिचे पर्यवसान भाषेतील अनेक शब्दांचे धातूपासून निर्वचन देण्यात आले. अशी निर्वचने देणाऱ्या ग्रथाला ' निरुक्त ' संज्ञा मिळाली. यास्काने ' निरुक्त ' ग्रंथ लिहून वैदिक शब्दांचे ( निघंटूतील ) निर्वचन करण्याचा प्रयत्न केला. ' निरुक्त ' हा ग्रंथ व्याकरणशास्त्राचा पूरक आहे. ' तदिदं विद्यास्थानं व्याकरणस्य कार्त्स्न्यम् ' ( निरुक्त– अध्याय १ खंड १५ ). म्हणून त्याला वेदाच्या सहा अंगांमध्ये-षडङ्गामध्ये[5] स्थान आहे. वैदिक मंत्रांचे स्पष्ट उच्चारण करता यावे या दृष्टीने निरुक्त व व्याकरण याबरोबरच ' शिक्षा' व छन्दःशास्त्र हींही निर्माण झाली. तरीपण या षडङ्गांमध्ये व्याकरण हे प्रधान अङ्ग आहे असे पतंजलीने महाभाष्यात म्हटले आहे. ' प्रधानं च षट्सु अङ्गेषु व्याकरणम् । प्रधाने च कृतो यत्नः फलवान् भवति ' । ( म. भाष्य पान ३ ) तात्पर्य, वैदिक शब्दांचे स्पष्टीकरण करण्याची इच्छा वेदद्रष्ट्या ऋषींना होती व त्याप्रमाणे ते करीत होते. आरण्यके व उपनिषदे यामध्येही वाणीच्या वर्णनाच्या प्रसंगाने व्याकरण शास्त्रान्तर्गत काही शब्द आढळतात. कारण त्यात धातु, प्रातिपदिक, नाम, आख्यात, प्रत्यय, विभक्ति, स्वर, ऊष्मन् , स्पर्श इत्यादि संज्ञा आल्या आहेत.

## प्रातिशाख्ये

व्याकरणशास्त्रात प्रातिशाख्यांचे स्थान कोणते ? ' प्रातिशाख्य ' शब्द अन्वर्थक आहे. वेदांच्या अनेक शाखा आहेत. त्यापैकी प्रत्येक शाखेचे प्रातिशाख्य होते. आता त्यापैकी फारच थोडी काळाच्या दाढेतून शिल्लक उरली आहेत प्रातिशाख्य ग्रंथांत वेदातील पद, स्वर, उच्चारण, पाठ, समास इत्यादिविषयी विवेचन केलेले असते. प्रातिशाख्यात लौकिक भाषेचा विचार केलेला नाही. तर मत्रांतील पदे घेऊन शुद्ध उच्चारण, स्वर, ऱ्हस्व, दीर्घ, संधिकार्य याविषयी प्रामुख्याने विवेचन आहे. प्रातिशाख्य ग्रंथांना ' पार्षद'ग्रंथही म्हणतात. यामुळे प्रातिशाख्यांचा व्याकरणग्रंथामध्ये अंतर्भाव होत नाही व त्याना व्याकरण म्हणू नये असे विद्वानांचे मत आहे. प्रातिशाख्यानंतर निरुक्त रचले असावे व निरुक्तानंतर पाणिनीचा अष्टाध्यायी हा व्याकरणग्रथ रचला गेला. ज्या कारणांसाठी प्रातिशाख्यांचा अंतर्भाव व्याकरणात होत नाही तशाच कारणांसाठी निरुक्ताचाही होत नाही. कारण पाणिनीने पद्धतशीर, शास्त्रशुद्ध व लाघवयुक्त असा ग्रंथ रचून त्यात वाक्यातील पदांचा परस्पर संबंध, पदांचा समास, पदांचा प्रकृतिप्रत्ययात्मक विभाग, संधिकार्ये, स्वर, सुबन्ताच्या व तिङन्ताच्या रूपांची सिद्धि यांचे विवेचन करून ' शब्दशास्त्र ' बनविले. त्यालाच पुढे पतंजलीने ' शब्दानुशासन ' किंवा व्याकरण नांव दिले. पाणिनीनंतर पाणिनीय व्याकरण संप्रदाय कसा वाढत गेला व तो कोठे स्थगित झाला हे आता मराठी वाचकांना ज्ञात झालेच आहे.[6]

तात्पर्य, संस्कृत व्याकरणाचा उगम व नंतर विकास खालील क्रमाने आढळतो. प्रथम तैत्तिरीय संहिता, मग ब्राह्मण ग्रंथ, आरण्यके, उपनिषदे, प्रातिशाख्ये, निरुक्त, पाणिनीची अष्टाध्यायी, वार्तिककारांची वार्तिके, त्यावर पतंजलीचे महाभाष्य व नंतर या आकर ग्रंथांवर अनेक टीकोपटींकांचे विणलेले जाळे !

## दादोबा पांडुरंगांचे मत

पण शेवटी मुख्य म्हणणे शिल्लक राहते ते हे की व्याकरणाचे प्रयोजन काय ? आमचे दादोबा पांडुरंग म्हणतात की ' शुद्ध कसे लिहावे व शुद्ध कसे बोलावे हे व्याकरण शिकल्याने समजते. ' व ते शुद्ध कोणते हे सांगण्याचे काम व्याकरणाचे आहे. भाषेत शुद्ध शब्द व शुद्ध प्रयोग थोडे असून त्या मानाने अपशब्द ( अशुद्ध- )च फार असतात. तेव्हा सुलभता म्हणून शुद्ध शब्द कोणते हे सांगितले की अशुद्ध कोणते हे

---

३. पहा– महाभाष्य, प्रस्तावनाखंड पान १०२–५ का. वा. अभ्यंकरकृत.

४. पहा– श. ब्रा. १।५।४।६–११ ताण्ड्य ब्रा. १।२०।१३ ; ऐ. ब्रा. ६।१।३ ; गोपथ ब्रा. १।२५.

५. शिक्षा कल्पो व्याकरणं निरुक्तं छन्दसां चयः । ज्योतिषामयनं चैव वेदाङ्गानि षडेव तु ॥

६. पहा– प्रस्तुत लेखकाचा ' पाणिनि आणि पाणिनिय व्याकरणसंप्रदाय ग्रंथ. '



अनुक्रमणिका








सांगावयास नकोच. पतंजलि महाभाष्यात तसेच म्हणतो. ' भाषेत शब्दांची संख्या फार मोठी आहे. एकदा काय झाले की बृहस्पतीने इंद्राला एक हजार देवांची वर्षे प्रत्येक शब्द उच्चारून शब्दशास्त्र सांगितले, पण शब्द संपले नाहीत. बृहस्पतीसारखा प्रख्यात वक्ता, इंद्रासारखा चलाख विद्यार्थी, एक हजार देवांचीं वर्षे अध्ययनाचा काल, तरी शब्दांचा अंत सापडला नाही ! मग आजकालची गोष्ट कशाला बोलता ? मनुष्य फार तर शंभर वर्षे जगतो, मग त्याचे सर्व आयुष्य शब्द शिकण्यातच खर्च होईल. तेव्हा प्रत्येक शब्द सांगणे हा काही खरा उपाय नाही" म. भाष्य पान १२. म्हणून या सर्व शब्दांना व्याकरणशास्त्रात नियम व अपवाद सांगून थोडक्यात शुद्ध शब्दांचे स्वरूप सूत्र-रूपाने सांगितल्यास भागेल. हे व्याकरणशास्त्राचे मुख्य प्रयोजन आहे. पाणिनीने चार हजार सूत्रे रचून तेच केले व मराठीच्या पाणिनीने-दादोबाने-ही तेच केले व ते कार्य पुढे इतर मराठी वैयाकरण करीत आहेत.[७] वर बृहस्पतीची कथा सांगितली ती अर्थवादात्मक जरी असली तरी प्रत्येक शब्दाची साधुता व व्युत्पत्ति सांगणे फार कठीण हा तिचा तात्पर्यार्थ आहे.

वस्तुतः पतंजलीने महाभाष्याच्या प्रारंभीच हा प्रश्न उपस्थित करून त्याला उत्तरही दिले आहे. पण ते वेगवेगळ्या भूमिकेवरून दिले आहे व ते आधुनिक ' पुढारलेल्या ' लोकांना पटणार नाही. पण त्यातही ग्राह्यांश आहे म्हणून ते येथे देतो. तो म्हणतो, ' कानि पुनः शब्दानुशासनस्य प्रयोजनानि । रक्षोहागमलघ्व-संदेहाः प्रयोजनम् ' इति । शब्दानुशासनाचे म्हणजे व्याकरणाचे प्रयोजन कोणते ? तर वेदांचे रक्षण, ऊह म्हणजे विभक्ती बदलणे, वेदाध्ययन, सौलभ्य आणि संशयराहित्य ही व्याकरणाची प्रयोजने आहेत. त्यापैकी वेदांचे रक्षण करण्याकरता व्याकरणाध्ययन अवश्य पाहिजे, कारण ज्या मनुष्याला लोप, आगम व वर्णांत बदल माहीत असतील तो मनुष्य वेदांचे चांगले रक्षण करील. उदाहरणार्थ, 'जहार' रूपा ऐवजी तो 'जभार' म्हणणार नाही. ' ऊहा ' चे उदाहरण म्हणजे वेदा-मध्ये जे मंत्र उच्चारले जातात त्यामध्ये सर्व लिंग व सर्व विभक्ति लावून शब्दांचे प्रयोग केले जात नाहीत. यज्ञकर्त्याला यज्ञाचे वेळी योग्य तो फेरबदल त्यात करावा लागतो. यासाठी व्याकरणाचे अध्ययन अवश्य आहे. वेदांगांमध्ये व्याकरण मुख्य आहे हे मागे सांगि-तलेच आहे, त्याचप्रमाणे सुलभता आणि असंदेह हीं ही व्याकरणाध्ययनाची प्रयोजने आहेत.

### शब्दावरील आघाताचे महत्त्व

चुकीचा शब्द किंवा चुकीचा स्वर ( आघात-Accent ) याचा प्रयोग केल्यास काय अनर्थ होतो हे दाख-विण्यासाठी खालील उदाहरण देण्यात येत आहे. असा चुकीचा शब्द वज्रासारखा यजमानाला घातक होतो हे ' इन्द्रशत्रु ' या शब्दाच्या चुकीच्या प्रयोगावरून सिद्ध होते.[८] एकदा काय झाले की वृत्रासुराच्या बापाने उग्र तपश्चर्या केली आणि त्याचे फल म्हणजे त्याच्या मुलाने—वृत्राने-इंद्राला ठार करावे असा वर मागितला. हे म्हणताना 'इन्द्रशत्रुः' म्हणजे 'इंद्राचा शत्रु' असे त्याला म्हणावयाचे होते. या ठिकाणी ' इन्द्रशत्रु ' हा षष्ठी तत्पुरुष समास आहे व या समासाला लागणाऱ्या स्वराचे ( आघाताचे ) उच्चारण करावयास पाहिजे होते. पण तसे न करता त्याच्या ऋत्विजाने ' इन्द्रः शत्रुः यस्य सः ' असा बहुव्रीहि समा-साच्या आघाताचे उच्चारण केल्याने विपरीत परिणाम झाला ! म्हणजे वृत्राने इंद्राला ठार करण्याऐवजी इंद्रानेच वृत्राला ठार केले ! असे होऊ नये म्हणून व्याकरणा-ध्ययनाची आवश्यकता आहे.[९] बोलताना वाक्यांतील

---

७. लघीयाञ् शब्दोपदेशो गरीयानपशब्दोपदेशः एवं हि श्रूयते । बृहस्पतिरिन्द्राय दिव्यं वर्षसहस्रं प्रति-पदोक्तानां शब्दानां शब्दपारायणं प्रोवाच नान्तं जगाम । किंपुनरद्यत्वे यो वर्षशतं जीवति । तत्र चागमकालेनैवायुः पर्युपयुक्तं स्यात् । तस्मादनभ्युपायः शब्दानां प्रतिपत्तौ प्रतिपदपाठः' । म. भा. पान १२

८. दुष्टः शब्दः स्वरतो वर्णतो वा मिथ्याप्रयुक्तो न तमर्थमाह । स वाग्वज्रो यजमानं हिनस्ति यथेन्द्र-शत्रुः स्वरतोऽपराधात् ॥ इति– म. भाष्य पान ४

९. स्वाहेन्द्रशत्रुर्वर्धस्वेति यदवर्तयत्तद् वृत्रस्य वृत्रत्वं यदब्रवीत् स्वाहेन्द्रशत्रुर्वर्धस्वेति तस्मादस्य । ( तै. सं. २।५।२।१ )

" यथाऽयमिन्द्रशत्रुर्यजमानं हिंसितवान् एवमन्योऽपि मिथ्याप्रयुक्तो मा हिंसीदित्यध्येयं व्याकरणम्" महाभाष्यदीपिका–भर्तृहरि.



अनुक्रमणिका

निरनिराळ्या शब्दांवर आघात दिल्याने अर्थ बदलतो हे आपण प्रत्यही पाहतोच. वेद सस्वर न चुकता का म्हणावयाचे याचे वरील उदाहरण आहे. कारण बहुव्रीहि समासाचा पूर्वप्रकृतिस्वर होतो तर तत्पुरुषाचा अंतोदात्त होतो हे व्याकरणाने स्पष्ट केले आहे. ते माहीत नसल्याने आहुति देणाऱ्या यजमानावर अनर्थ कोसळला !

### अग्निवर्णनाचा व्याकरणपर अर्थ !

वेदांतील एखाद्या मंत्राचा जरी वेगळा अर्थ असला तरी वैयाकरणाला त्यात व्याकरण दिसते ! उदाहरणार्थ, अग्नीचे वर्णन करताना मंत्रद्रष्टा म्हणतो – 'त्याला चार शिंगें, तीन पाय, दोन मस्तकें, सात हात, तीन प्रकारें बांधलेला असा अग्नि हा वृषभ असून मोठा देव आहे व तो मोठयाने ध्वनि करून मर्त्यांमध्ये प्रवेश करता झाला' ! ("चत्वारि शृङ्गा त्रयो अस्य पादा द्वे शीर्षे सप्त हस्तासोऽस्य । त्रिधा बद्धो वृषभो रोरवीति महो देवो मर्त्यानाविवेश" । )

वैयाकरण म्हणतो हे अग्नीचे वर्णन नसून व्याकरणाचे आहे. कसे ते पहा- "शब्दांच्या चार जाती आहेत– नाम, आख्यात्, उपसर्ग आणि निपात्; (ही चार शृंगें) भूत, वर्तमान आणि भविष्य काळ, (हे तीन पाय), शब्दाची दोन रूपें नित्य व अनित्य किंवा स्फोट व ध्वनि (दोन मस्तकें). सात विभक्ती (सात हात); शब्द छाती, गळा व मस्तक या तीन (ठिकाणी बांधलेला). याला 'वृषभ' म्हटले कारण तो इच्छा पुरवितो. (वृषभो वर्षणात्) हा शब्द करतो. हा महादेव- शब्द- मर्त्य प्राण्यांमध्ये शिरता झाला.' या मोठ्या देवाशी आपले साधर्म्य व्हावे म्हणून व्याकरणाचे अध्ययन आवश्यक आहे. यावर कै. म. म. वासुदेवशास्त्री म्हणतात–[१०] 'शब्दाशी तादात्म्य झाले असता अर्थातच त्या शब्दाचा जो अर्थ परब्रह्म वगैरे त्याच्याशीही त्या वैयाकरणाचे तादात्म्य होते.'

वैयाकरणाच्या मते अर्थ कळल्याशिवाय अध्ययन करणे हे शुष्क असते. शुष्क लाकूड अग्नीशिवाय मुळीच जळत नाही; प्रकाशमान होत नाही. तद्वतच शब्दांचे आहे. व्याकरणाध्ययनाशिवाय तो अर्थ कळत नाही. प्राचीनकाळी अशी समजूत होती की शब्दांचा प्रयोग करण्यात ज्याला त्यातील भेदांचे व विशिष्ट उपयोगांचे ज्ञान आहे असा कुशल विद्वान लोकात जय मिळवितो.[११] ('एकः शब्दः सम्यग् ज्ञातः स्वर्गे लोके कामधुग् भवति') । इतर सामान्य जनांना शब्दांचे अर्थ नीट समजत नाहीत; एखादा ग्रंथ वाचून नुसते शाब्दिक ज्ञानसुद्धा होत नाही पण ज्याप्रमाणे कामसंपन्न भार्या सुंदर वस्त्र नेसून पतीपुढे आपली तनु प्रकट करते त्याप्रमाणे वैयाकरणाचे पुढे ही वाणी आपली तनु प्रकट करते ! '[१२] चाळणीतून सातू चाळतात त्याप्रमाणे वैयाकरण बुद्धीने वाणी शुद्ध करून उच्चारतात.

व्याकरणाचे प्रयोजन कोणते म्हणून वर जी अनेक उदाहरणे पतंजलीच्या महाभाष्यातून वर उद्धृत केली आहेत ती मागे म्हटल्याप्रमाणे आधुनिक पंडिताना पटावयाची नाहीत हे मी मान्य करतो. पण व्याकरणाशिवाय आपल्या भाषेचा विकास, प्रौढता, सौंदर्य, रेखीवपणा व मराठी न जाणणाऱ्या लोकांची सोय, ग्रंथसंपादन ही सर्व लक्षात घेता प्रत्येक साहित्यिकाने व्याकरणाचे अध्ययन अवश्य केले पाहिजे. त्याशिवायही काही माणसे शुद्ध बोलतात व शुद्ध लिहितातही व आपण त्यांना 'शिष्ट'ही म्हणतो. भाषा बोलत असताना मनुष्याचे लक्ष्य व्याकरणाकडे नसते हे खरे. shall आणि will यांचा प्रयोग कसा करावा हे इंग्रज माणसाला व्याकरण न शिकताही सामान्यपणे समजते. पण इतरांना मात्र ते व्याकरणावरून समजून घ्यावे लागते. असे असूनही त्यातील बारकावे, निरनिराळी उदाहरणे त्याला समजल्यास त्याचे ज्ञान अधिक स्पष्ट होईल. नाहीतर मातृभाषेचे व्याकरण शिकण्याची आवश्यकता नाही असाच याचा अर्थ होईल. पूर्वी व्याकरणशास्त्र शिकण्यास बारा वर्षे लागत. (द्वादशवर्षैः व्याकरणं श्रूयते ।) हे त्याचे आत्यंतिक टोक आहे असे समजून सुशिक्षित माणसाने व्याकरणाचे ज्ञान करून घेतले पाहिजे. इत्यलमतिविस्तरेण.

---

१०. पहा– व्याकरण महाभाष्य- मराठी अनुवाद भाग १ पान ७.

११. यस्तु प्रयुङ्क्ते कुशलो विशेषे शब्दान् यथावद् व्यवहारकाले । सोऽनन्तमाप्नोति जयं परत्र वाग्योगविद् दुष्यति चापशब्दैः ॥ (च + अपशब्दैः) महाभाष्य, आ. १

१२. उतो त्वस्मै तन्वं विसस्रे । जायेव पत्य उशती सुवासाः ॥ म. भाष्य, आ. १

रवींद्रनाथ ठाकूर : अनु० दुर्गा भागवत

# लोकसाहित्य – बाळगाणी : २ :

वृष्टि पडे टापूर टेपूर नदी एल बान
शिबू ठाकुरेर बिये दल तीन कन्ये पान
एक कन्ये रांधेन बाडेन एक कन्ये खान
एक कन्ये ना खेये बापेर बाडी जान

( पाऊस टपटप पडतो आहे. नदीला पूर आला आहे. शिबू ठाकुराचे लग्न झाले. त्याला तीन मुली दिल्या. एक मुलगी रांधते वाढते; एक मुलगी खाते. एक मुलगी न खातापिता बापाच्या घरी निघून जाते ).

या वयात हे गाणे ऐकल्याबरोबर वाटते की शिबू ठाकुराने ज्या तीन मुलींशी लग्न लावले, त्यात मधली मुलगीच सर्वांत हुशार. परंतु एक वय असे होते की त्यावेळी अशा प्रकारची स्वभाव-विश्लेषणाची शक्ति माझ्याजवळ नव्हती. त्यावेळी या चारही ओळी माझ्या बाळपणातल्या मेघदूतासारखाच झाल्या होत्या. माझ्या मनःपटलावर काळ्या ढगांनी आच्छादलेला पावसाळी दिवस आणि उग्र लाटा उसळणारी नदी मूर्तिमान दिसूं लागे. त्यानंतर मला असे दिसू लागे की नदीतल्या वाळूच्या बेटावर दोन लांबट होडया बांधलेल्या आहेत. आणि शिबू ठाकुराच्या नुकत्याच लग्न झालेल्या नवऱ्या त्या बेटावर उतरून स्वैपाकपाणी करताहेत. खरे सांगायचे तर शिबू ठाकुराच्या जीवनाला मोठे सुखाचे जीवन म्हणण्यास मन जरा काचकूच करते. कारण तिसरी वधू भयंकर चिडून तडकाफडकी माहेरी निघून जाते. तरी पण या चित्रामुळे त्या माझ्या सुखचित्राला कसलाही आघात पोंचू शकला नाही. या अजाणाला तेव्हा मुळी कळूच शकले नाही की या एकाच ओळीत हतभागी शिबू ठाकुराच्या जीवनावर काही एक हृदय-विदारक, शोकपूर्ण, परिणाम झाल्याचे सूचित केले आहे. परंतु मी मागे सांगितलेच आहे की स्वभाव-विश्लेषणापेक्षा चित्र साकारण्याकडेच त्या वेळी माझ्या मनाचा कल अधिक होता. आता मला उमगते की हतबुद्ध शिबू ठाकुराची धाकटी बायको तडकाफडकी बापाच्या घरी निघून गेली, हे काही मोठे आकर्षक चित्र नव्हे.

हा शिबू ठाकूर केव्हा झाला, तो कोण होता, असे एकेक वेळी मनात येते, असेलही तो. कदाचित् या गीतात पुरातन विस्मृत इतिहासाचा एक अति क्षुद्र भग्न अंश राहून गेला असेल. आणि दुसऱ्या अशाच गीतात कदाचित् त्याचा आणखी एक तुकडा राहून गेला असणेही संभवनीय आहे.

ए पार गंगा ओ पार गंगा मध्यिखाने चर
तारि मध्ये बसे आछे शिब सदागर
शिब गेल श्वशुरबाडी बसते दिल पिंडे
जलपान करिते दिल शालिधानेर चिंडे
शालिधानेर चिंडे नई रे बिन्निधानेर खई
मोटा मोटा सबूरि कला कागमारे दई *

[ अलीकडे गंगा, पलीकडे गंगा. मध्ये वाळूचे बेट. त्याच्यात शिव सौदागर बसला आहे. शिव सासुरवाडीला गेला. त्याला बसायला पाट दिला. न्याहारीला शालिभाताचे पोहे दिले– शालिभाताचे पोहे नव्हत बिन्नीभाताचे मुरमुरे. मोठमोठी सबरि ( जातीची ) केळी आणि छान लागलेले दही ].

यात जो भाव व्यक्त झाला आहे, त्यावरून माझा तर्क असा चालतो की शिबू ठाकूर आणि शिबू सौदागर हा एकच माणूस असला पाहिजे. दांपत्य संबंधात दोघांच्याही बाबतीत एक विशेष गोम आहे आणि मला वाटते की आहाराचा संबंधही उपेक्षणीय नाही. त्याहीपेक्षा आणखी म्हणजे गंगेच्या मधले जे स्थळ उल्लेखिले गेले आहे तेही नवपरिणितांच्या प्रथमप्रणय-

* कागमाला : शिंकें, ह्याचा अपभ्रंश कागमार असावा. कागमारे दइ = 'शिंक्यापर सांभाळून ठेवलेले दही' असा अर्थ असावा. अदमुरे दही असे न म्हणता, 'छान लावलेले दही' असे म्हणणे अधिक सयुक्तिक असे वाटते.








साधनेच्या बाबतीत एक अति उपयुक्त असे स्थान आहे.

या स्थळाकडे वाचकांनी लक्ष देऊन पाहावे. प्रथम अनवधाने शिबू सौदागराला न्याहारीच्या प्रसंगी शालिभाताचे पोहे दिल्याचा उल्लेख केला आहे. परंतु दुसऱ्याच क्षणी संशोधन करून म्हटले आहे की ' शालिधानेर चिंडे नय रे बिन्निधानेर खई ( शालिभाताचे पोहे नाहीत रे बिन्निभाताचे मुरमुरे ! ).

जणु काही या घटनेच्या सत्य संबंधाच्या बाबतीत तिळमात्र चूक होण्याची शक्यताच नाही. याप्रमाणे संशोधनाच्या मार्फत फराळाचे वर्णन करताना जो अवांतर विषय आलेला आहे, त्यामुळे जावयाच्या सासुरवाडीला होणाऱ्या पाहुणचाराचा गौरव अत्यंत ठसठशीतपणे प्रगट झाला आहे, असेही म्हणता येणार नाही. या बाबतीत सासुरवाडीच्या मिरासदारीपेक्षा सत्याची बूज कवीने अधिक राखलेली दिसते. परंतु याही बाबतीत निश्चित असे काहीच म्हणता येत नाही. मला वाटते की हे सारे स्वप्नासारखे आहे. शालिभाताचे पोहे बघता बघता, दुसऱ्या क्षणीच तो बिन्नि भाताचे मुरमुरे खाऊन सुध्दा उठला का ? मला असेही वाटते की शिबू ठाकूर केव्हा तरी या प्रमाणे शिबू सौदागरात रूपांतर पावला असला पाहिजे. केव्हा ते सांगता येणार नाही.

मंगळ आणि गुरु यांच्या कक्षेत अनेक तुटलेले ग्रह आहेत असे ऐकिवात आहे. कुणी कुणी म्हणतात की एक सबंधच ग्रह फुटून त्याचे तुकडे तुकडे झाले आहेत. ही गाणी देखील अशाच फुटलेल्या तुकड्यांचे एक विश्व आहे, असे माझ्या मनात येते. अनेक प्राचीन इतिहासांचा, प्राचीन स्मृतींचा, भग्न अंश या सगळ्या गाण्यात विभागला गेला आहे; कुणीही पुरातत्त्वशास्त्रज्ञ त्या अंशांना एकत्र जोडू शकणार नाही; परतु आमच्या कल्पनेला मात्र या भग्न अवशेषातूनच त्या विस्मृत जगाचा, लांबचा आणि जवळचा असा सहज परिचय घडतो.

हे खरे की बालकाची कल्पना या ऐतिहासिक ऐक्याची जुळणी करण्यास उत्सुक नसते. तिच्या लेखी सर्वच वर्तमानकाळ आणि वर्तमानाचा काय तो गौरव. बालकाला प्रत्यक्ष चित्रच हवे असते. त्या प्रतिमा भावरूप अश्रूच्या वाफेने अंधुक करणे त्याला आवडत नाही.

खाली दिलेल्या गाण्यातल्या सुटया सुटया प्रतिमा जणु काही पक्ष्यांच्या थव्याप्रमाणे उडायला निघाल्या आहेत. या प्रत्येकीच्या स्वतंत्र जलद गतीमुळे बालकाच्या मनावर नवे नवे आघात होऊन ते विचलित होऊन जाते.

नोटन नोटन पायरागुलि झौंटन रेखेछे
बडो साहेबेर बिबिगुलि नाईते एसेछे
दु पारे दुइ रुइ कातला भेसे उठेछे
दादार हाते कलम छिल छुँडे मेरेछे
ओ पारते दुटि मेये नाईते नेबेछे
झुनु झुनु चूलगाछटि झाड़ते नेगेछे
के रेखेछे के रेखेछे दादा रेखेछे
आज दादार टेला फेला काल दादार बे
दादा जाबे कोन् खान दे बकुलतला दे
बकुलफूल कुड़ते कुड़ते पेये गेलुम माला
रामधनुके बाद्दि बाजे सीतेनाथेर खेला
सीतेनाथ बलेरे भाई- चालकड़ाई खाब
चाल कड़ाई खेते खेते गला हल काठ
हेथा होथ, जल पात्र चित्पुरेर माठ
चित्पुरेर माठेते बालि चिक् चिक् करे
सोना मुखे रोद नेगे रक्त फेटे पड़े

( नोटनने पारवे व डोकीवर बुचडा राखला आहे. बड्या साहेबाच्या बायका स्नानाला आल्या आहेत. दोन्ही तीरावर दोन रोहू व काटला मासे वाहात आले आहेत. दादाच्या हाती लेखणी होती. तो ती फेकून मारतो आहे. पलीकडच्या तीरावर दोन स्त्रिया स्नानासाठी आल्या आहेत. झून झून करीत त्या केस झटकू लागल्या. कोण ठेवतो, कोण ठेवतो. दादा ठेवतो. आज दादाचा ' टेलाफेला ' उद्या दादाचे लग्न. दादा कुठे जातो ? बकुळीच्या तळी. बकुळीचीं फुले वेचता वेचता मला माळ मिळाली. इंद्रधनुष्याचे वाद्य वाजते आहे. सीतानाथाचा खेळ. सीतानाथ म्हणतो ' अरे भाई, उडदाचे वरण खाता खाता गळा सुकून गेला. इथून तिथून पाणी चित्पूरच्या मैदानात आणले. चित्पूरच्या मैदानात वाळू चमचम करते. सोन्याच्या तोंडावर उन्ह पडून रक्त उसळून येते. )



अनुक्रमणिका






याच्यातली कोणतीही प्रतिमा आम्ही पकडू शकत नाही. आम्हाला कोणत्याही प्रतिमा धरता येत नाहीत. डोकीवर बुचडा असलेला नोटन, पारवे, वड्या साहेबाच्या बायका दोन्ही तीरावर वाहून येणारे दोन रोहू व काटला मासे, पलीकडच्या तीरावर स्नानात गुंतलेल्या दोन स्त्रिया, दादाचा विवाह, इंद्रधनूच्या वाद्याच्या साथीवर होणारा सीतानाथाचा खेळ, आणि मध्या-न्हीच्या उन्हात तापलेल्या वाळूने चमकणाऱ्या मैदानात तळपणाऱ्या उन्हाच्या माऱ्याने लाल झालेले तोंड– हे सारेच स्वप्नासारखे आहे. त्या तीरावर ज्या दोन स्त्रिया नहात बसल्या आहेत आणि दोन्ही हातांनी कांकणांचा झण् झण् असा आवाज करीत केस झटकताहेत, त्या प्रतिमेच्या दृष्टीने पाहिले तर खऱ्या आहेत. परंतु प्रासंगिकतेच्या दृष्टीने पाहिले तर त्या अद्‌भुत स्वप्नच आहेत असे वाटते.

एक गोष्ट वाचकांनी अवश्य लक्षांत ठेवली पाहिजे की, स्वप्नांची रचना करणे फार कठीण आहे. एकदम पाहिले तर असं वाटते की जरा इकडून तिकडून काही बाही करून लिहिले की गाणे तयार होणे शक्य आहे. परंतु काही बाही कल्पना येणे सोपे नाही. जगातल्या सर्व व्यवहारांची आपल्याला इतकी संवय झालेली असते की सहज भाषांपेक्षा रुळलेल्या गोष्टीच आप-ल्याला जास्त सहज वाटतात. न बोलावताही वृथा बडबडण्याची क्रिया सर्व कामात आपल्या आपणच येऊन उपस्थित होते; त्याचप्रमाणे जिथे जिथे ती हात घालते तिथे भाव आपले लहान मेघासारखे रूप टाकून देऊन गोळीबंद होतो. त्याला आता आकाशात उड-ण्याची क्षमताच राहात नाही. गाणे ही गोष्टच अशी आहे की ती एखाद्याच्या बाबतीत सोपी म्हटली तर अत्यंत सोपी, सहज अशी असते. परंतु ज्याच्या बाबतीत ती कठीण त्याला ती सर्वथैव असाध्यच असते. जे सर्वात साधे ते सर्वात कठीण. जे सहज असते त्याचे मुख्य लक्षण हेच.

वाचकांनी माझ्या सांगण्याप्रमाणे लक्ष दिल्यास त्याना असे आढळून येईल की मी पहिल्याने जे गाणे दिले होते, त्याच्याशी हे दुसरे गाणे किती मिसळून गेले आहे ते. ज्याप्रमाणे मेघा-मेघात स्वप्ने-स्वप्ने मिस-ळून जातात, त्याप्रमाणेच त्या गाण्यांचीही सरमिसळ होत असते; त्यामुळे कुठल्या कवीलाही चोरीचा उपद्व्याप करावा लागत नाही. आणि कुणी समीक्षकही भावविपर्यासाचा दोषही देत नाही. वस्तुतः ही गाणी म्हणजे मानसिक मेघराज्यातली लीला. तिच्या बाबतीत मर्यादा, आकार किंवा अधिकार यांचा प्रश्नच उद्भवत नाही. तिथे पहारेकऱ्यांचा किंवा कायदे-कानूंचा जराही संबंध पोचत नाही. दुसऱ्या ठिकाणी मिळालेले गाणे पुढे दिले आहे; त्याच्याकडे जरा लक्ष लावून पाहा.

ओ पारे जन्तिगाछटि जन्ति बड़ो फले
गो जन्तिर माथा खेये प्राण केमन करे
प्राण करे हाईटाई गला हल काठ
कतक्षणे जाब रे भाई हरगौरीर माठ
हरगौरीर माठे रे भाई पाका पाका पान
पान किनलाम, चून किनलाम, ननदे भाजे येलाम
एकटि पान हाराले दादाके ब' ले देलाम
दादा दादा डाक छाड़ि दादा नाईका बाड़ि
सुबल सुबल डाक छाड़ि सुबल आछे बाड़ि
आज सुबलेर अधिवास काल सुबलेर बिये
सुबलके निये जाब आमि दिग्‌नगर दिये
दिग्‌नगरेर मेयेगुली नाईते बसेछे
मोटा मोटा चूलगुलि गो पेते बसेछे
चिकन चिकन चूलगुलि झाड़ते नेगेछे
हाते तादेर देवशाँथा मेघ नेगेछे
गलाय तादेर तक्तिमाला रक्त छुटेछे
परने तादेर डूरे शाड़ि घूरे पड़ेछे
दुई दिके दुई कात्‌ला माछ भेसे उठेछे
एकटि निलेन गुरुठाकुर एकटि निलेन टिये

टियेर मार बिये
नाल गामछा दिये
अशखेर पाता धने
गौरी बेटी कने
नका बेटो वर

त्याम् कुड् कुड् बाद्दिबाजे, चडक-डांगाय घर (पलीकडच्या तीरावर जायफळाचे झाड. त्याला जायफळे खूप खूप लागतात. जायफळाचे बोंड खाल्ले तर प्राण कासावीस होतो. गळा कोरडा पडतो. बाबारे, काही वेळ हरगौरीच्या मैदानावर जा. हरगौरीच्या मैदानावर









अनुक्रमणिका

पिकी पिकी पाने. पाने खरीदली. चुना विकत घेतला. नणंद-भावजयीचा खेळ मी खेळले. एक पान हरल्यावर दादाला सांगून दिले. दादा, दादा म्हणून हाक मारली, दादा घरी नाही. सुबल, सुबल म्हणून हाक मारली. सुबल घरी आहे. आज सुबलचे राहणे, उद्या सुबलचे लग्न. सुबलला आणायला मी दिग्नगरला जाते. दिग्नगरच्या बायका नहायला बसल्या आहेत. त्यांचे लांब लांब केस; ते पसरून त्या बसल्या आहेत. चमकणारे केस त्या झटकताहेत. त्यांच्या हातातल्या देवशंखांच्या बांगड्या ढगाप्रमाणे वाटताहेत. त्यांच्या गळयात पुतळ्यांची माळ आहे. ती लाल चुटुक दिसते आहे. त्यांची नेसती सुती साडी फिरत राहिली आहे. दोन बाजूंना दोन काटला मासे वाहून येताहेत. एक मासा गुरुदेवांनी नेला. एक पोपटाने नेला. पोपटाच्या आईचे लग्न. ल्हाळ्याचे देठ आणि पंचा देऊन. पिपळपानांचे धन. गौरी ( अष्टवर्षा ) नवरी मुलगी आहे. छोटा काका वर आहे. दूम कड कड वाद्ये वाजतात. चडक-टेंभावर घर आहे.)

या साऱ्या गाण्यांमध्ये काही अन्वेषण करायचे म्हटले तर तो एक गोंधळच होईल. पहिल्या गाण्यात मला असे दिसते की उन्हात वाळवलेला भात (आलाचाल) खाल्लेला सीताराम नांवाचा नृत्यप्रिय, हांवरा असा मुलगा, प्रिपूर्णीच्या घाटावर पाणी पिण्यास चालला आहे. दुसऱ्या गाण्यात असे दिसते की सीतानाथ उडदाचे वरण खाऊन पाणी शोधण्यासाठी चित्पुराच्या माळावर येऊन ठेपला आहे. परंतु तिसऱ्या गाण्यात पाहिले तर सीताराम पण नाही, सीतानाथ पण नाही; परंतु एका हतभागी भावजयीचा द्वेष करण्यात चूर असलेली नणंद जायफळ खाऊन तहान लागल्यामुळे हरगौरीच्या मैदानावर पान खाण्यासाठी गेली आणि भावजयीकडून असावधपणे घडलेला क्षुल्लक अपराध थोरल्या भावाच्या कानावर घालण्यासाठी सारा गाव तिने आरडून ओरडून डोक्यावर घेतला.

हीच तर तीन गाण्यांमधली विसंगती. त्याशिवाय प्रत्येक गाणे एकेकटे घेतले तर त्यातही घटनांचा एकसूत्रीपणा दिसत नाही. बहुतांशी कथा ही घडलेलीच नसते हे तर उमगतेच, परंतु त्याबरोबर असेही नजरेस पडते की कथा घडवायला गेले की जगात प्रमाण पुरावे विपुल मिळत असल्याने, ढोबळ सत्यापेक्षा, ती ( कथा ) अधिक विश्वासार्ह मानली जाते. आणि म्हणूनच याच्यात मनमानेल तसेही दिलेले नसते. या गाण्यातली कथा सत्यही नसते अन् असत्यही नसते. दोहोंनाही सारखाच वाव आहे; म्हणूनच ज्या गाण्यात एके ठिकाणी सुबलच्या लग्नाचा उल्लेख आहे, ती घटना काही असंभवनीय नाही. परंतु ती सत्य घटना आहे असेही म्हणता येत नाही.

दादा दादा डाक छाड़ि दादा नाइको बाड़ि
सुबल सुबल डाक छाड़ि सुबल आछे बाड़ि

( दादा, दादा म्हणून हाक मारली, दादा घरी नाही सुबल, सुबल अशी हाक मारली, सुबल घरी आहे. ) जसे सुबलचे नांव तोंडी आले, तसेच ते बाहेरही पडले; 'आज सुबलचा मुक्काम, उद्यां सुबलचे लग्न' ही गोष्ट सुद्धा स्थिर झाली नाही. लागोलाग दिग्नगरच्या लांब केसांच्या बायकांची कथा उद्भवली. स्वप्नांत अगदी असेच घडते. असेही असेल की, शब्द-सादृश्य किंवा दुसऱ्या कुठल्या तरी लटक्याच क्षुल्लक संबंधाचे अवलंबन करून क्षणाक्षणाला, एका कथेवरून दुसरी कथा रचली जाते. क्षणापूर्वी त्या कथांच्या संभाव्यतेचे कुठलेच कारणही नव्हते. आणि क्षणानंतरही संभाव्यतेच्या राज्यातून दृढमूल होण्यापूर्वीच त्या विनायासे साफ विरूनही गेल्या. सुबलच्या विवाहाचा वाचकांनी कोणत्या तरी तत्कालीन किंवा स्थानीय सत्य घटनेचा आभास असल्याने, जरी स्वीकार केला, तरीही कमलदेठरूपी पंचा देऊन पोपटाच्या आईचे लग्न काही झाले तरी सामाजिक इतिहासात अंतर्भूत होऊ शकत नाही. कारण विधवाविवाह पोपटांच्या जातीत प्रचलित असला तरी कमलदेठरूपी पंचा देण्याचा व्यवहार या परंपरेत केव्हाही ऐकिवात नाही. परंतु छंदाच्या तालातालातून, गोड गळयातून ज्यांच्यापाशी या साऱ्या अवास्तव आणि विसंगत घटना प्रकट केल्या जातात. ती ( मुले ) त्यांच्यावर विश्वासही ठेवीत नाहीत आणि त्यांच्याबद्दल शंकाही घेत नाहीत. त्यांच्या मनश्चक्षूना स्वप्नाप्रमाणे आणि प्रत्यक्ष चित्र दिसते.

मुले प्रतिमा देखील अतिशय सहजपणे अगदी थोड्या प्रयासाने पाहू शकतात. याचे कारण मी मागे



अनुक्रमणिका






सांगितले आहेच. इच्छाशक्तीच्या बाबतीत बालकाशी देवाचे एकप्रकारचे सादृश्य दिसते. बालक जसे अगदी सहज इच्छामात्रेकरून सृजन करू शकते तसे आपण करू शकत नाही. जरा विचार करून पहा. चिंधीला गाठ मारून, डोके असलेल्या माणसाची कल्पना करून, त्या माणसाला आपले मूल मानून, त्याचे लाड करणे, सामान्य गोष्ट नाही. आपल्याला एखाद्या मूर्तीची माणूस म्हणून कल्पना करायची असल्यास तिला हुबे-हुब माणसाप्रमाणे घडवावे लागते. त्यात एवढीशी जरी उणीव यथातथ्यतेत राहिली तरीही आपल्या कल्पनेवर आघात होतो. आपण बाह्य विश्वाच्या जड विचारांनी जखडले गेलो आहोत. आपले डोळे त्यांना जे शिकवले असते त्याहून कुठलीही गोष्ट निराळ्या रूपात पाहूच शकत नाहीत. परंतु बालकाचे डोळे जे जे पाहातात, त्याला बघितल्याबरोबरच आपल्या लहरीप्रमाणे ती वस्तु मनात घडवूनही घेऊ शकतात. माणसाची मूर्ति आणि चिंधीचे खेळणे यांच्यात कसलीही विसदृशता आहे असे त्याला ( बालकाला ) वाटतच नाही. बालक आपल्या इच्छेप्रमाणे घडवलेली सृष्टी समोर खडी टाक-लेली पाहू शकते.

परंतु तरीही गाण्यातली ही सारी प्रयासावाचून घडलेली जी चित्रे आहेत ती केवळ बालकाच्या सहज सृजनशक्तीच्या द्वारा निर्माण झालेली आहेत असे नव्हे. त्यांच्यात अनेक ठिकाणी रेखेची एवढी सुस्पष्टता आहे की, ती आपल्या संशयी डोळ्यांसमोर सुद्धा अगदी त्रोटक वर्णनानेही ताबडतोब चित्र उभे करते.

या अनेक प्रतिमा म्हणजे एकच रेखा. एकाच कथेचे चित्र. आगकाडी ज्याप्रमाणे एकाच फटक्यात भपकन पेटते, त्याप्रमाणे मुलाचे चित्त एकाच कथेच्या हेलकाव्यात, एक समग्र चित्र एका पळात उभारू शकते. थोडेसे योजून नंबर काही रचायचे हे इथे चालायचेच नाही.

‘ चित्पुरेर माठेते बालि चिक् चिक् करे ’

( चितपुरच्या मैदानावरची रेती चकूचक् करते )

ह्या एकाच गोष्टीत एक खूप मोठे पडिक मैदान दोन-प्रहरच्या प्रखर उन्हातले आमच्या नजरेसमोर उभे राहते.

‘ परणे तार डूरे शाड़ी घूरे पडे छे — ’

( नेसणारणीची सुती साडी फेर घालीत राहिली आहे). सुती साडीच्या सुताच्या रेषा, जोराने गरगरत वाह-णाऱ्या पाण्याच्या भोंवऱ्यांच्या धारांप्रमाणे आहेत. तंतु अंगयष्टीला फेरे घालून वेढून धरून ठेवतात. ते या एकाच ओळीत एका क्षणात चित्रित होते. याचा एक पाठभेद आहे तो असा :

परणे तार डुरे कापड उड़े पड़े छे

( नेसणारणीचे सुती वस्त्र उडते आहे. ) ही प्रतिमाही वाईट नाही.

आय घूम आय घूम बाग्दिपाडा दिये
बाग्दिदेर छेले घूमाय जाल मुड़ि दिये

( कोळीवाडयांकडून ये ये, झोंपे ये. कोळ्याचे पोरगे जाळ्याची घडी घालून ठेवून झोंपतात. )

या शेवटल्या ओळीत, जाळ्याची घडी घालून ठेवून कोळ्यांचे पोरगे इथे आडवे होऊन कसे बिनघोर झोंपी गेले आहेत, हे चित्र वाचकांनाही डोळ्यांसमोर आणता येईल. जास्त काही नाही. हीच जाळ्याची घडी घालून ठेवण्याची गोष्ट मुद्दाम सांगितली की कोळ्यांच्या मुलांची झोंप विशेष रूपानेच डोळ्यांपुढे येते.

आय रे आय छेलेर पाल माछ धरते जाय
माछेर काँटा पाये फुटल दोलाय चेपे जाय
दोलाय आछे छपन कड़ि गुनते गुनते जाय
ए नदीर जलटुकु टल्मल् करे
ए नदीर धारे रे भाई बालि झुरझुरु करे
चाँदमुखते रोद लेगे छे रक्त फुटे पड़े

( ये ये पोरांच्या टोळक्या, मासे धरायला जाऊ. माशाचा कांटा पायी रुतला. झोपाळ्या वर बसायला जा. झापाळ्यावर आहेत छप्पन्न कवड्या, मोजीत मोजीत जाऊ. या नदीचे पाणी खळखळ करते. या नदीकिना-रींची वाळू, अरे भाई, सरसर सरकते आहे. चंद्रमुखाला (मुलाला ) उन्ह लागते; रक्त उसळून आले आहे. )

झोपाळ्याच्या बाबतीत छप्पन (?) कवड्या मोजतांना जरी वाचकांना थोडे ज्ञान झाले, तरीही शेवटच्या तीन ओळींच्या बाबतीत त्यांनी उपेक्षा करू नये. नदीचे पाणी खळबळ करते आहे आणि तीरा-वरची वाळू झुरझुर करून घसरून घसरून पडते आहे. पुळण असलेल्या नदीचे असे संक्षिप्त आणि सुस्पष्ट चित्र आणखी कुठे मिळणार ?










हे एका तऱ्हेचे चित्र झाले. आणखी दुसरा एक प्रकार आहे. त्या चित्रांत एक वर्णनीय विषय घेऊन त्याच्या अनुरोधाने सर्व हालचाली आपल्या मनात जागृत होतात. बहुधा एका क्षुल्लक विषयाच्या उल्लेखाने सारी बंगाली घरे, बंगाली समाज, जिवंत होऊन माझ्या हृदयाला स्पर्श करतो. या साऱ्या क्षुद्र कथा, मोठ्या साहित्यांत इतका सहज, आपसुक आणि मोकळेपणाने प्रवेश करू शकत नाहीत; आणि जर त्यांचा प्रवेश झालाच, तर त्यांचे रूपांतर किंवा भावांतर होते.

दादा गो दादा शहरे जाव<br>
तिन टाका करे माइने पाव<br>
दादार गलाय तुलसीमाला<br>
बऊ बरने चंद्रकला<br>
एई दादा लोमार पाये पड़ि<br>
बउ एने पाउ खेला करि

( दादा रे दादा शहरी जा. तीन रुपये पगार मिळव. दादाच्या गळयात तुळशीमाळा. बायकोचा रंग चंद्रकळा. दादा तुझ्या पाया पडते. वहिनी आण, तिच्याशी खळन ). दादाची मिळकत जास्त नाही. परंतु बहिणीच्या मते तीही खूपच. या तीन रुपये वेतनाच्या स्वावलंबनाचे उदाहरण देऊन बहीण विनवणी करते की.

दादा तुझ्या पाया पडते, वहिनी, आण; तिच्याशी खेळेन. '

ती चतुर मुलगी स्वतःचा असा स्वार्थ साधण्यासाठी दादालाही प्रलोभनाच्या मिषाने ' वहिनीचा रंग चंद्रकळा ' ( चंद्रासारखा गोरा ), असे म्हणून भुलवायला मागे पुढे पाहात नाही. जरी बहिणीचा खेळ तीन रुपये मिळकतीच्या मानाने महाग असला, तरी मी खचित सांगतो की तिच्या भीत भीत केलेल्या विनवणीची बूज राखण्यात विलंब होत नाही. परंतु हे सर्वच बंधुप्रेमामुळे होते असे नव्हे.

उलू उलू मादारेर फूल<br>
बर आसछे कत दूर<br>
बर आसछे बाघ्नापाड़ा<br>
बड़ो बऊ गो रान्ना चड़ा<br>
छोटो बऊ लो जल्के जा<br>
जलेर मध्ये न्याकाजोका<br>
फूल फूटे छे चाकाचाका<br>
फुलेर बरन करि<br>
नटे शाकेर बड़ि

उल्लूल्लू पांगाऱ्याचे फूल. नवरदेव येतो आहे किती दुरून. नवरदेव येतो आहे वाघपाड्याहून. थोरल्या सुने, अग, स्वैपाकाला लाग. धाकट्या सुने पाणी आणायला जा. पाण्यामध्ये जळवा आहेत ढीगभर जळवा. फूल चकचकित उमलले आहे. मी फूल अर्पण करते. माठाची भाजी वाढते.

जावयाच्या आगमनाची प्रतीक्षा करणाऱ्या खेडवळ स्त्रियांचे कुतूहलाचे व आनंदोत्सवाचे चित्र आपणहून प्रस्फुटित होते. म्हणूनच त्याला अनुलक्षून, शेवऱ्याचे किंवा म्हातारीच्या झाडाचे ( शाखोटकाचे ) कुंपण घालून केलेले खेडेगावातले सारे रस्ते व घाट, वने, तळी कमरेवर कळशी घेतलेल्या नव्या सासुरवाशिणी आणि ज्यांचे अवगुंठन सैल झाले आहे, अशा साऱ्या गृहिणी जादु केल्याप्रमाणे खडबडून उठताहेत,

याप्रमाणे प्रत्येक गाण्यात, प्रत्येक लहान सहान कथेत, बंगाल देशाची एकप्रकारची मूर्ति. खेडेगांवचे एकप्रकारचे संगीत, आणि घराचा एक विशिष्ट आनंद उपलब्ध होतो. परंतु ते सारे मोठ्या प्रमाणात उद्धृत करायला मला भय वाटते. कारण " भिन्नरुचिर्हि लोकः "

चित्र जर काहीसे अद्‌भुत असले तर त्यात काही वावगे नाही. उलट चांगलेच आहे. कारण नवीनपणामुळे ते मनावर अधिकच परिणाम करते. मुलाच्या लेखी अद्‌भुत असे काही नाही. ते दुनियेत संभाव्यतेच्या मागे अगदी पूर्वदिशेच्या टोकापर्यंत जरी गेले, तरी ते मान वळवून चारी दिशांना डुंकून सुद्धा पाहणार नाही. ते म्हणेल जर थोडेसे का जरी स्वाभाविक असले तर सारेच स्वाभाविक आहे. जर एक गोष्ट अद्‌भुत नसली तर दुसरी तरी अद्‌भुत कशी असेल ? ते म्हणेल " एका डोक्याचा माणूस कोणतीही शंका उपस्थित न करतां मी तो खरा आहे असा विश्वास बाळगून चालतो. कारण तसा मनुष्य आम्हाला प्रत्यक्ष दिसतो. दोन डोक्यांच्या माणसाच्या बद्दलही मी कसलाही प्रश्न उपस्थित करूं इच्छित नाही. कारण असा माणूस मी माझ्या मनात स्पष्ट पाहू शकतो.



अनुक्रमणिका






त्याचप्रमाणे मुंडके नसलेला माणूसही माझ्या दृष्टीने तितकाच खरा आहे. कारण तो माझ्या अनुभवाला अगम्य असा नाही." एक गोष्ट आहे-कुणी एक माणूस सभेत गेला आणि म्हणाला, "आज रस्त्यात एक नवल मी पाहिले. मारामारीत एका माणसाचे मुंडके कापल्यामुळे तुटून पडले. परंतु त्या अवस्थेतही तो दहा पावले चालून गेला." सगळेजण आश्चर्यचकित होऊन म्हणाले, "काय म्हणता हो? दहा पावले चालून गेला?" त्यांच्यात एक स्त्री होती. ती म्हणाली, "दहा पावले चालला यात काहीच आश्चर्य मानायला नको. तो अगदी पहिल्याने पायांनी चालू लागला तेच मोठे आश्चर्य."

सृष्टीतही या प्रकारचा पहिला पदक्षेप हेच महान् आश्चर्य! जे काही घडलेले आहे, तेच तेच पहिले आश्चर्य. त्यानंतर जे होत असते त्यात नवल कसचे? मूल या प्रथम आश्चर्याकडेच पहिल्याने दृष्टि टाकते. दृष्टि पडायचाच अवकाश की त्याला अनेक वस्तु दिसतात; आणखा कितीही वस्तु असणे त्याच्या लेखी मुळीच अशक्य नाही. यामुळेच लोकगीतांच्या प्रांतात शक्याशक्यतेची सीमा ठरविण्याविषयी वाद उत्पन्न होत नाही.

---

## आदर्शवादाला ओहोटी?

"आज असे दिसून येत आहे की लेखनातील आर्तता, लेखनातील तळमळ, ही कमी झाली असून त्या जागी वैफल्य, किंचित चिडखोरपणा व सामान्यपणे ध्येयशून्यता दिसून येत आहे. पारतंत्र्याविरुद्ध उठविलेला आवाज, प्रतिभेने घेतलेले उड्डाण, गेल्या १५ वर्षांत तितकेसे दिसून येत नाही. ब्रिटिशांच्या विरुद्ध लढा चालू असताना ज्या भावना हृदयाला आवाहन करीत होत्या त्या भावना आता दिसून येत नाहीत. उलट जे साहित्य निर्माण होत आहे त्यामध्ये स्वार्थी जीवनाची तरफदारी केली जात आहे. आदर्शवाद कमी कमी होत आला आहे. त्यागाची प्रेरणा लुप्त झाली आहे. लोकशाहीतील भाषणस्वातंत्र्य अमर्यादपणे वापरले जात आहे. दोषैकदृष्टि अधिक वाढत आहे आणि लोकही तिचे अधिकाधिक स्वागत करीत आहेत."

—न. वि. गाडगीळ

[ मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपदावरून ]










डॉ. नी. र. वऱ्हाडपाण्डे

# सांख्यदर्शनांतील सत्कार्यवाद, प्रकृति व पुरुष

कपिल व त्याचे सांख्यदर्शन अतिशय प्राचीन आहे. न्याय व वैशेषिक दर्शनांच्या मानाने या दर्शनात तार्किक विचार कमी आहे. पण त्यात आढळणारे कार्यकारणाच्या स्वरूपाचे विश्लेषण विचारार्ह आहे.

**सत्कार्यवाद**

सांख्यांचे कार्यकारणविषयक मत सत्कार्यवाद या नावाने प्रसिद्ध आहे. या मतानुसार 'उत्पत्तेः पूर्वं कार्यं सत् ।' म्हणजे उत्पत्तीपूर्वी देखील कार्य सत् असते. जगात कोणतेच नवीन कार्य निर्माण होत नाही. फक्त पूर्वी अव्यक्त असलेले कार्य व्यक्त होते. अंधाऱ्या खोलीतली कोणतीच वस्तु दिसत नाही. पण यावरून तेथे कोणतीच वस्तु नसते असे ठरत नाही. दिवा लावल्यावर तेथे अनेक वस्तु दिसतात. या वस्तु नव्याने दिसत असल्या तरी नव्याने निर्माण झालेल्या नसतात. त्या पूर्वीपासूनच तेथे असतात. अंधारामुळे अदृश्य असतात एवढेच. दिवा लावल्यावर त्या दृश्य होतात. कार्यही या वस्तूप्रमाणेच अदृश्याचे दृश्य, म्हणजे अव्यक्ताचे व्यक्त होते. पूर्वी नसलेले नवे निर्माण होत नाही.

( १ ) असदकरणात् ।

या सिद्धांताला प्रमाण म्हणून सांख्यांनी पाच युक्तिवाद दिलेले आहेत. यातला पहिला असदकरणात् असा आहे. जे असत् आहे ते केले जाऊच शकत नाही. ते सर्वथा असत्च आहे. वन्ध्यापुत्र व शशशृङ्ग ही असत् आहेत. त्यामुळे त्यांची उत्पत्ति होऊ शकत नाही. निळेपणा पिवळा होऊ शकत नाही. निळ्या वस्तूला पिवळा रंग दिला जाऊ शकतो, पण खुद्द निळा रंगच पिवळा होऊ शकत नाही. ज्याचे स्वरूपच पीताभावाचे आहे त्यात पीतत्व येऊ शकत नाही.

बौद्धांच्या मते बीजाचा नाश झाल्यावर अंकुर निर्माण होतो. अर्थात् बीजाभावानेच अंकुराचा भाव सिद्ध होतो. मग अभावातून भाव निर्माण होऊ शकत नाही, असतातून सत् निर्माण होऊ शकत नाही, असे का मानावे ?

यावर सांख्यांचे उत्तर असे की बीजाभावातून अंकुर निघत नसून बीजातून निघतो. बीजाभावातून अंकुर निघत असेल तर तो घटाभावातून निघण्यास अडचण कोणती ? बीजाचा अभाव व घटाचा अभाव यात काय फरक आहे ? बीज नष्ट होते तेव्हा बीजाचाच अभाव असतो असे नाही. घटाचाही अभाव असतो. मग बीजाभावातूनच अंकुर निघाला, घटाभावातून नाही, असे म्हणण्यास प्रमाण काय ? सर्व अभाव सारखेच असतात. आकाशात बीजाभावही असतो व घटाभावही असतो. तेव्हा अभावातून उत्पत्ति होते असे मानले तर वाटेल त्यातून वाटेल ते उत्पन्न होईल. आकाशातल्या बीजाभावापासून अंकुर निघत नाही, अंकुर निघायला पूर्वी बीज असावेच लागते. म्हणून उत्पत्ति सतापासूनच होते, असतापासून नाही.

काही वादी म्हणतात की सत् व असत् हे कार्याचे धर्म आहेत. घटनिर्मितीमध्ये घट हे कार्य असते. निर्मितीच्या पूर्वी घट नसतो, म्हणजे अभाव हा त्याचा धर्म असतो. निर्मितीच्या नंतर तो असतो म्हणजे भाव हा धर्म त्यात येतो. म्हणून उत्पत्तीच्या पूर्वी घट सत् असतो असे मानता येत नाही.

हे म्हणणे तर्कसंगत नाही. धर्म नेहमी धर्मीच्या आश्रयाने राहतो. गुलाबाचा रंग व सुवास गुलाब निर्माण होण्यापूर्वीच गुलाबात कसा राहील ? जो घट नाहीच त्यात अमुक धर्म – मग तो असत्ता

का असेना – आहे असे म्हणणे चमत्कारिकच आहे.

पदार्थ व त्याचे धर्म यात काहीतरी संबंध असतो. किंवा हे धर्म म्हणजेच त्या पदार्थाचे स्वरूप असते. जसे रक्तत्व या धर्माचा घटाशी संबंध आहे व जलधारणयोग्यता हा धर्म हे घटाचे स्वरूपच आहे. ज्यात जलधारणयोग्यता नाही त्याला घटच म्हणता येणार नाही.

रंग किंवा जलधारणयोग्यता याप्रमाणेच अभाव हा देखील एक धर्म आहे असे म्हणता येत नाही, कारण अभावाचा कशाशी संबंध असू शकत नाही वा अभाव हे एखाद्या पदार्थाचे स्वरूपही असू शकत नाही. अभावाशी संबंध म्हणजे आकाशकुसुमांचा हार ! त्याचप्रमाणे ज्या पदार्थाचे स्वरूपच अभावमय आहे त्याला पदार्थच म्हणता येत नाही. ज्यात भोकांशिवाय काहीच नाही असे कापडच असू शकत नाही. अभाव हेच ज्याचे स्वरूप आहे असा घटच असू शकत नाही. अर्थात भाव व अभाव हे पदार्थाचे धर्म आहेत, उत्पत्तीच्या पूर्वी अभाव हा घटाचा धर्म असतो व उत्पत्तीच्या नंतर भाव हा त्याचा धर्म होतो, असे म्हणता येत नाही.

अभाव हा घटाचा धर्म कधीच असू शकत नाही म्हणून उत्पत्तीच्या पूर्वी देखील घट सत् असतो असे मानले पाहिजे. पण उत्पत्तीनंतरची सत्ता व उत्पत्तीपूर्वीची सत्ता यात फरक आहे. उत्पत्तीपूर्वीची सत्ता अव्यक्त असते. उत्पत्ति झाली म्हणजे ती व्यक्त होते. तिळात नेहमीच तेल असते पण ते बाहेरून दिसत नाही. तीळ घाण्यात घालून पिसले म्हणजे ते बाहेर येते. तिळात जे अव्यक्त असते तेच घाण्यात व्यक्त होते. मूर्तिकार जेव्हा दगडाची मूर्ति करतो तेव्हा त्या दगडात बाहेरून काहीच आणून टाकीत नाही. फक्त दगडातले अनावश्यक अंश काढून फेकून देतो. असे करण्याने दगडात जी मूर्तीची आकृति आधीपासूनच अव्यक्त रूपाने असते ती व्यक्त होते. याप्रमाणेच जेव्हा कार्याची उत्पत्ति होते तेव्हा पूर्वी अव्यक्त स्वरूपात असलेले सत् व्यक्त होते. पूर्वी असत् असलेले सत् होत नाही.

### उपादानग्रहणात्, सर्वसंभवाभावात्, शक्तस्य शक्यकरणात्

सत्कार्यवाद सिद्ध करण्यासाठी सांख्य आणखीही पुढील युक्तिवाद करतात –

प्रत्येक कार्याचा आपल्या उपादान कारणाशी संबंध असतो. उपादान कारण म्हणजे एखादा पदार्थ घडवण्यास लागणारे द्रव्य. घट बनवण्यास माती लागते म्हणून माती हे घटाचे उपादान कारण आहे. जर कार्य अस्तित्वातच नसेल तर त्याचा आपल्या उपादानकारणाशी संबंध कसा राहील ? म्हणून कार्य नेहमीच सत् असते व त्याचा आपल्या उपादान कारणाशी संबंध असतो असे मानले पाहिजे.

यावर कुणी म्हणेल की कार्याचा उपादानाशी संबंध उत्पत्तिनंतरच असतो, त्यापूर्वी नसतो. पण असे असेल तर मातीपासून घटच होऊ शकतो, पट होऊ शकत नाही असे का ?

कार्य व कारण यांचा नित्य संबंध मानला नाही तर वाटेल त्यापासून वाटेल ते निर्माण होईल. घटोत्पत्तीपूर्वी मातीचा घटाशी काहीच संबंध नसतो असे मानले तर त्यावेळी मातीचा घटाप्रमाणेच पटाशीही काहीच संबंध नसतो म्हणून मातीपासून कधी घट तर कधी पट निर्माण होईल. असंबद्धता सर्वथा एकरूप असते. "क्ष" चा "य" व "ग" या दोघांशीही काहीच संबंध नसेल तर या दोघांशीही त्याचे नाते सारखेच आहे असे म्हटले पाहिजे. नेल्सन व नेपोलियन हे माझे कोणीच लागत नाहीत. म्हणून त्यांच्याशी माझा मुळीच नातेसंबंध नाही किंवा सारखाच नातेसंबंध आहे अशी दोन्ही विधाने करता येतात. मातीची अनुत्पन्न घटाशी जी असंबद्धता आहे त्याहून











अनुक्रमणिका

अनुत्पन्न पटाशी असलेली असंबद्धता कशी काय भिन्न आहे ?

यावर कुणी म्हणेल की मातीचा घटच करता येतो पट करता येत नाही कारण मातीत घट निर्माण करण्याची शक्ति आहे, पट निर्माण करण्याची शक्ति नाही. अशा शक्तीची कल्पना केल्याने मातीचा अनुत्पन्न घटाशी संबंध मानायची जरूर उरत नाही.

यावर सांख्य विचारतात "ही शक्ति हा काय प्रकार आहे ? या शक्तीचा कार्याशी काही संबंध असतो की नाही ? शक्ति जे कार्य करू शकते त्याला शक्य कार्य म्हणतात. तुमच्या शक्तीचा या शक्याशी काही संबंध आहे की नाही. जर असेल तर अस्तित्वात नसलेल्या शक्याशी हा संबंध कसा राहू शकेल ? जर नसेल तर वाटेल त्या शक्तीने वाटेल ते शक्य निर्माण होईल.

### कारणभावाच

सत्कार्यवादाच्या सिद्धीसाठी कारण व कार्य हीं एकच असतात, भिन्न नसतात व म्हणून कारण अस्तित्वात असले की कार्य अस्तित्वात असलेच पाहिजे असाही युक्तिवाद सांख्य करतात. कारण व कार्य यांचे तादात्म्य सिद्ध करण्यासाठी सांख्यांनी खालील प्रमाणे दिलेली आहेत.

( १ ) कार्य हा कारणाचा धर्म आहे. धर्म धर्मीहून वेगळा असू शकत नाही. अर्थात् कार्य व कारण ही एकच आहेत. घट हा मातीचा धर्म आहे. माती एक विशिष्ट आकार धारण करते तेव्हा तिला घट म्हणतात. माती नेहमीच घटाकार नसते. यावरून हा धर्म अनित्य आहे एवढेच म्हणता येईल, तो धर्मच नव्हे असे म्हणता येणार नाही. गोलत्व हा चेंडूचा धर्म आहे. लांबपणा हा दोरीचा धर्म आहे तसाच घटाकार हा मातीचा धर्म आहे, मग तो अनित्य का असेना. म्हणून घट व माती ही एकच आहेत.

( २ ) ज्यांचे तादात्म्य असते त्यांच्यातच उपादान व उपादेय हा संबंध राहू शकतो. उपादान म्हणजे द्रव्य व उपादेय म्हणजे त्या द्रव्याचा वापर करून घडवलेली वस्तु. पदार्थ व त्याचा आकार यांच्यात उपादान व उपादेय संबंध राहू शकत नाही. कारण पट हे घटाचेच रूप नाही. चौकोन व त्याचे चार कोन यांच्यात उपादान व उपादेय संबंध आहे. मातीचा घट बनतो तसाच चार कोनांचा चौकोन बनतो. चौकोन व त्याचे कोन हे भिन्न पदार्थ मानता येत नाहीत. त्याचप्रमाणे घट व माती हे भिन्न पदार्थ मानता येत नाहीत.

( ३ ) भिन्न पदार्थांचा संयोग होऊ शकतो. लेखणी व कागद यांचा संयोग होऊ शकतो. कारण लेखणी व कागद या वस्तु भिन्न आहेत. पण घट व तज्जनक माती यांचा संयोग होऊ शकत नाही. घटात सर्वत्रच माती भरून राहिलेली असते. संयोगात एक दुसऱ्यात सर्वत्र भरलेला नसतो. दोन्ही पदार्थांचे काही भाग एक दुसऱ्यापासून वेगळे असतात. मातीचा कोणताही भाग घटापासून असा वेगळा राहू शकत नाही. म्हणून घट व माती वेगळी मानता येत नाहीत.

घट व माती भिन्न न मानण्याचे आणखी एक कारण असे की भिन्न पदार्थात अप्राप्ति नांवाचा संबंध असू शकतो. अप्राप्ति म्हणजे एकमेकांपासून दूर राहणे. जसा हिमालय व विन्ध्य यांच्यात अप्राप्ति हा संबंध आहे. घट व त्यातली माती यांच्यात अशा तऱ्हेचा संबंध असू शकत नाही.

( ४ ) भिन्न पदार्थांचे गुरुत्व वेगळे असते. गुरुत्व म्हणजे वजन किंवा मोठेपणा. एक रुपयाचे वजन दोन रुपयांच्या वजनाएवढे असू शकत नाही. पण घटरूपधारण करण्यापूर्वी मातीचे जेवढे गुरुत्व असते तेवढेच घटरूप धारण केल्यावरही असते. घट व माती या दोन वस्तु असत्या तर नुसत्या मातीचे वजन माती + घट या वस्तूच्या वजनापेक्षा कमी राहले असते. "क्ष" चे वजन क्ष + य



अनुक्रमणिका








च्या वजनापेक्षा कमी असलेच पाहिजे. जेव्हा " क्ष + य " चे वजन क्षच्या वजनाइतकेच असते तेव्हा ( क्ष + य ) व क्ष याना वेगळे मानता येत नाही.

सांख्यांच्या मतावर पुढील पूर्वोत्तरपक्ष होतात–

**पूर्वपक्ष :** जेव्हा तन्तूंची उत्पत्ति होते तेव्हाच पटाची उत्पत्ति होत नाही. जेव्हा पटाचा नाश होतो तेव्हा तन्तूंचा नाश होतोच असे नाही. जेव्हा पट उकलून त्याचे धागे वेगळे केले जातात तेव्हा पट नष्ट होतो, पण तंतु नष्ट होत नाहीत. रिळात गुंडाळलेले तंतु पाहिले तर आपण पट पाहिला अशी बुद्धि होत नाही. " पटाचा तंतु " या शब्दप्रयोगाने देखील पट व तंतु भिन्न आहेत हेच द्योतित होते, नाहीतर " पटाचा तंतु " असे म्हणणे पटाचा पट असे म्हणण्यासारखेच ठरले असते. कारण व कार्य याची अर्थक्रिया म्हणजे विनियोग देखील भिन्न असतात. तंतु नेसले जात नाहीत, पट नेसला जातो. कार्य व कारण यात इतके भेद असताना त्याना एकच कसे मानतां येईल ?

**उत्तरपक्ष :** तुम्ही सांगितलेले भेद ऐकान्तिक नाहीत. हे भेद तिरोभाव व आविर्भाव या स्वरूपाचे आहेत. कासव आपली अंगे आखडून बसतो तेव्हा त्या अंगात चालण्याचे सामर्थ्य नसते. जेव्हा तो अंगे पसरवतो तेव्हा त्यात चालण्याचे सामर्थ्य येते. पण यावरून कासवाला काही नवीन अवयव फुटले असे कुणी म्हणत नाही. त्याचप्रमाणे तंतु पटाकार असले म्हणजेच नेसले जातात यावरून पटाकार होण्याने काहीतरी नवीन निर्माण झाले असे ठरत नाही.

" पटाचे तंतु " हा शब्दप्रयोग " सभेचे लोक " या शब्दप्रयोगासारखा आहे. " सभेचे लोक " या शब्दप्रयोगाने लोकाव्यतिरिक्त सभा नांवाचा काही पदार्थ आहे असे द्योतित होत नाही. त्याचप्रमाणे " पटाचे तंतु " या शब्दप्रयोगाने तंतूंच्या व्यतिरिक्त पट नावाचा काही पदार्थ आहे असे द्योतित होत नाही. अर्थक्रियाभेदाने देखील कार्य व कारण यांची भिन्नता स्थापित होत नाही. एकच अग्नि प्रकाश देणे, जळणे वगैरे अनेक अर्थक्रिया करू शकतो. एकच वस्तु व्यस्त असताना जे कार्य करू शकत नाही ते समस्त असताना करू शकते. चार भोई एकेकट्याने पालखी उचलू शकत नाहीत, पण मिळून उचलू शकतात.

## काल

सत्कार्यवाद मानला म्हणजे कालाचे क्षेत्र मर्यादित होते. उत्पत्ति व विनाश हेच मानले नाहीत तर भूत व भविष्य उरत नाहीत, फक्त वर्तमानकालच उरतो. प्रत्येक वस्तु सदा वर्तमान असते, कधी ती अव्यक्त असते तर कधी व्यक्त, म्हणजे कधी तिचे ज्ञान होते तर कधी होत नाही. उत्पत्ति व विनाश मानलेच तर केवळ ज्ञानाची उत्पत्ति व विनाश होतो असे मानावे लागते. काल हा केवळ ज्ञानापुरता मर्यादित असल्यामुळे काल म्हणजे नुसते निरनिराळ्या ज्ञानात असलेले पौर्वापर्य, त्याला स्वतंत्र अस्तित्व नाही, असे सांख्य मानतात.

## प्रकृति

सत्कार्यवाद सिद्ध झाल्यावर व्यक्त म्हणजे दिसणाऱ्या जगाचे कारण अव्यक्तरूपाने असणारे जगच असले पाहिजे हे ओघानेच येते. अव्यक्त स्वरूपात असणाऱ्या जगालाच सांख्यांनी प्रकृति हे नाव दिलेले आहे.

## पूर्वपक्ष

पण सगळ्या जगाचे एकच कारण आहे असे का मानावे ? घटाचे कारण अव्यक्त घटरूपी माती, पटाचे कारण अव्यक्त पटरूपी तंतू, याप्रकारे जगातल्या अनेक वस्तूंची अनेक कारणे मानली पाहिजेत.

## उत्तरपक्ष

( १ ) जे परिमित असेल त्याला अन्तिम कारण मानता येत नाही. कार्याच्या तुलनेने कारण अपरिमित असते. तंतु, दोर, सतरंजी वगैरे अनेक रूपे

धारण करू शकतात. पट हे त्यातले एक आहे. त्याचे कारण अर्थात तंतु पटापेक्षां अधिक अपरिमित आहेत. तसेच तंतूचे कारण जे कापूस ते तन्तूंपेक्षाही अधिक अपरिमित असते. कापूस अनेक आकार धारण करू शकतो. त्यातला तन्तूंचा आकार हा एक आहे. याप्रमाणे आधीचे कारण नंतरच्या कारणापेक्षा अधिक परिमित असते. तेव्हा एखादे अपरिमित कारण असेल तर ते अंतिम असले पाहिजे. तसेच ते एकच असले पाहिजे. कारण जगातल्या कोणत्याही एका वस्तूचे कारण परिमित असते. सर्व जगाचे एक कारणच फक्त अपरिमित असू शकते. जे कारण दुसऱ्या कारणाहून भिन्न आहे ते परिमित असते. कारण त्याचे गुण त्या दुसऱ्या कारणाच्या गुणांहून भिन्न असतात. म्हणून अपरिमित कारण साऱ्या जगाचे एकच मानले पाहिजे. हेच अव्यक्त अथवा प्रकृति होय.

( २ ) जगातले सारे पदार्थ समन्वित असतात म्हणून देखील त्या सर्वांचे एकच कारण मानले पाहिजे. समन्वित असणे म्हणजे एकाच तत्त्वाने किंवा गुणाने युक्त असणे. समन्वित पदार्थांचे एकच कारण असते. कुण्डल, केयूर, कंकण वगैरे वस्तु समन्वित आहेत. कारण या सर्वात कांति, पिवळेपणा वगैरे सोन्याचे गुण असतात. म्हणून त्या सर्वांचे सोने हे कारण समजले जाते. याचप्रमाणे जगातील यच्चयावत् पदार्थात सत्त्व, रज व तम हे तीन गुण असतात. म्हणून त्या सर्व पदार्थांचे सत्त्व, रज व तम या गुणांनी युक्त असे एकच अव्यक्त कारण मानले पाहिजे.

सत्त्व, रज व तम यांचे स्वरूप प्रीति, अप्रीति व विषाद असे आहे. प्रीति म्हणजे सुख, अप्रीति म्हणजे दुःख व विषाद म्हणजे मोह. जगातल्या प्रत्येक पदार्थांत, सुख देण्याची, दुःख देण्याची, सुन्न, जाणीवरहित करण्याची किंवा सुखदुःखरहित उदासीनतेची, उपेक्षेची अवस्था निर्माण करण्याची शक्ति असते. अग्नि हिवाळयात सुख, उन्हाळयात दुःख व अति झाल्यास बेशुद्धि किंवा त्यापासून बरेच दूर राहिल्यास सुखदुःखविरहित उपेक्षेची भावना निर्माण करतो.

सत्त्व, रज व तम ही अनुक्रमाने प्रकाश, प्रवृत्ति व या दोघांचाही निरोध करतात. प्रकाश म्हणजे अनुभव. सत्त्व सुखकर असते. समाधान हे त्याचे स्वरूप आहे. समाधान ही शांतीची अवस्था असते. रजाचे स्वरूप अप्रीति किंवा असुख हे आहे. अप्रीति ही असमाधानाची व म्हणून अशांतीची अवस्था आहे. अशांतीच्या अवस्थेपासून सुटण्याची धडपड होत असते. म्हणून रजाचे स्वरूप प्रवृत्ति हे मानलेले आहे. मोह म्हणजे बेशुद्धि. हिच्यात अनुभूति व क्रिया या दोहोंचा अभाव असतो. म्हणून तमोगुण हा सत्त्व व रज या दोघांचाही नियामक वा विरोधी मानला गेला आहे.

पदार्थांमध्ये, सत्त्व, रज व तम एकाच प्रमाणात नसतात. कशात सत्त्वाचे, तर कशात रजाचे व तमाचे प्राधान्य असते. प्रकृतीत मात्र हे तिन्ही गुण एकाच प्रमाणात असतात. किंबहुना तिन्ही गुणांची साम्यावस्था हेच प्रकृतीचे स्वरूप आहे.

### पुरुष

सांख्यदर्शनात प्रकृतीच्या जोडीला पुरुषाचा उल्लेख होतो. पुरुष म्हणजे सुखदुःखांचा अनुभव घेणारा आत्मा.

जगांतला प्रत्येक पदार्थ सुख, असुख, मोह वगैरे निर्मिणाऱ्या त्रैगुण्याने भरलेला आहे. अनेक गुणांनी युक्त असलेल्या पदार्थाला संघात म्हणतात. संघाताला नेहमी दुसऱ्या कशाची तरी अपेक्षा असते. तो दुसऱ्या कुणासाठी असतो. आकर्षक पदार्थ आकृष्यमाण पदार्थाचे अस्तित्व सूचित करतो. पत्नीच्या अस्तित्वावरून पतीचे अस्तित्व सिद्ध होते. याचप्रमाणे सुखकारकता व दुःखकारकता हे गुण सुखदुःख अनुभवणाऱ्याचे अस्तित्व सूचित करतात.



अनुक्रमणिका







" सुखदुःखांचा अनुभव मनाला वा बुद्धीला येतो. त्यासाठी आत्म्याची कल्पना आवश्यक आहे, " या आक्षेपाला सांख्यांचे उत्तर असे की बुद्धि व मन हे स्वतःच सुखदुःख देऊ शकतात. बुद्धीचा व्यापार अनिरुद्ध चालल्याने सुख व निरुद्ध झाल्याने दुःख होते. स्वतः बुद्धीतच सुखकारकता व दुःखकारकता असल्यामुळे सुखदुःखांचा भोक्ता बुद्धीच्या व्यतिरिक्त कोणीतरी मानला पाहिजे.

### समालोचन

सांख्यांनी सत्कार्यवादाच्या सिद्धीसाठी जी उदाहरणे दिली आहेत त्याहून वेगळया उदाहरणांचा विचार केला तर सत्कार्यवादाचा अपुरेपणा स्पष्ट होतो. तिळातून तेल निघते. त्याला तेलाची उत्पत्ति न म्हणता अभिव्यक्ति म्हणणे रास्त आहे. पण अम्लजन व उदजन यांच्या रासायनिक मिश्रणाने पाणी होते. या प्रक्रियेला उत्पत्ति न म्हणता अभिव्यक्ति म्हणणे बरोबर वाटत नाही. तिळांत तेल असते तसे अम्लजन व उदजन यांत पाणी असत नाही. पाणी ही नवनिर्मिती आहे.

नवनिर्मिती मानल्याखेरीज सत्कार्यवादाचे देखील भागत नाही, कारण सत्कार्यवाद देखील अभिव्यक्तीची नवनिर्मिती मानतोच. तिळातून तेलाची अभिव्यक्ति होण्यापूर्वी तेलाची अभिव्यक्ति नसते. ती नवी निर्माण होते. अभिव्यक्तीची जर नवनिर्मिती होऊ शकते तर पाण्यासारख्या इतर पदार्थांची देखील होऊ शकेल.

यावर सांख्यांचे एक भाष्यकार वाचस्पतिमिश्र म्हणतात की– " अभिव्यक्तीची निर्मिति " हा शब्दप्रयोगच अयोग्य आहे. घटनिर्मितीपूर्वी घटाची अभिव्यक्ति नव्हती व घटनिर्माणानंतर ती उत्पन्न झाली असे मानल्याने अनवस्था माजेल. अभिव्यक्तीची उत्पत्ति मानायची तर उत्पत्तीची उत्पत्ति का मानू नये ? घटोत्पत्तिपूर्वी उत्पत्ति नसते व नंतर असते म्हणून घटोत्पत्ति देखील नवी उत्पन्न होते असे म्हणावे लागेल. उत्पत्तीची उत्पत्ति ...... या मालिकेचा अंतच लागणार नाही. म्हणून उत्पत्ति स्वयंसिद्ध मानावी लागते. तशीच अभिव्यक्ति देखील स्वयंसिद्ध मानावी.

वाचस्पति मिश्रांचे हे म्हणणे प्रत्ययकारक नाही. अभिव्यक्तीला स्वयंसिद्ध मानल्याने " अभिव्यक्तीची अभिव्यक्ति होते " असे मानता येणार नाही. पण "अभिव्यक्तीची उत्पत्ति होते" या पक्षापासून सुटका नाही. प्रकाशाला प्रकाशित करण्याची जरूर नसली तरी उत्पन्न करण्याची जरूर असतेच. अभिव्यक्तीची अभिव्यक्ति करण्याची जरूर नसली तरी तिची उत्पत्ति करण्याची जरूर असतेच.

जे असत् आहे ते सत् होऊ शकत नाही असे सांख्य म्हणतात. पण असताला सत् करणे हेच मुळी उत्पत्तीच्या क्रियेचे स्वरूप आहे. सांख्यांच्या प्रक्रियेप्रमाणे देखील कार्यापूर्वी त्याची अभिव्यक्ति असत् असते व कार्यानंतर सत् होते.

घटोत्पत्तिपूर्वी घट असत् मानला तर असत्ता हा त्याचा धर्म मानावा लागेल. पण जो घट नाहीच त्याला धर्म तरी कसा असू शकेल अशी सांख्यांना अडचण वाटते. ही अडचण धर्म व धर्मी यांचा उल्लेख करणारी सर्वच वाक्ये अस्तित्वबोधक असतात या समजुतीने निर्माण केलेली आहे. ही समजूत चुकीची आहे. " सोन्याच्या पर्वतात सोने मिळणारच " या वाक्यात सुवर्णमयता हा सुवर्णपर्वतांचा धर्म आहे असे सांगितले आहे. पण सुवर्णपर्वत अस्तित्वात असतात असा या वाक्याचा अर्थ नाही. " शशशृङ्ग व आकाशपुष्प ही एकाच जातीची आहेत " असे म्हटल्याने सशाला शिङ्गे व आकाशाला फुले असतात असे म्हटल्यासारखे होत नाही. याचप्रकारे " घट असत् आहे " या वाक्यात घटाचे अस्तित्व निर्दिष्ट केलेले नाही. " लाल घोडा ", चौकोनी वर्तुळ, " अस्तित्वात नसलेले घर " या शब्दप्रयोगात " लाल ", " चौकोनी " व " अस्तित्वात नसलेले " ही विशेषणे आहेत. ही सर्व विशेषणे एकरूप






अनुक्रमणिका





आहेत. ती विशेष्याचे अस्तित्व बोधित करीत नाहीत. लाल घोडा असेल किंवा नसेल, नुसते " लाल घोडा " म्हटल्याने लाल घोडा आहेच असे ठरत नाही. अस्तित्वाचा बोध करावयाचा असेल तर " क्ष "च्या धर्मांचा उल्लेख करून भागत नाही. " क्ष अस्तित्वात आहे " असे स्पष्ट विधान करायला पाहिजे.

उपादानकारण कार्यात राहते हे विधान घट व माती या उदाहरणाला लागू होते. पण वृक्ष व बीज, यांना ते लागू होत नाही. माती घटात राहते पण बीज वृक्षात रहात नाही, वृक्षाला फळ लागते व त्यात बीज निघते, यावरून बीज वृक्षात रहाते असे समजणे बरोबर नाही. कारण वृक्ष उत्पन्न करणारे बीज नष्ट झालेले असते. फळातले बीज या मूळ बीजाहून वेगळे असते.

कार्य कारणाच्या काळी अस्तित्वात असल्याशिवाय त्याचा कारणाशी संबंध असू शकणार नाही ही सांख्यांची भीती व्यर्थ आहे. दोन अस्तित्वात असलेल्या पदार्थांचाच संबंध असतो असे नाही. दिवस व रात्र यात कार्यकारणांप्रमाणेच पौर्वापर्याचा संबंध आहे. पण ही दोन्ही एकाच वेळी कधीच अस्तित्वात राहू शकत नाहीत. दिवसानंतर नियमाने रात्र येते म्हणून दिवसात रात्र अव्यक्त रूपाने असते असे म्हणणे हास्यास्पद ठरेल.

अभावातून कार्य निर्माण होऊ शकणार नाही. कारण सगळे अभाव सारखेच असतात असे म्हणणे समर्थनीय नाही. घट उत्पन्न होण्याच्या पूर्वीचा घटाभाव, त्याचा नाश झाल्यानंतरचा घटाभाव व वंध्यापुत्राचा अभाव हे सारे अभाव एकरूप नाहीत. घटोत्पत्तीपूर्वीच्या घटाभावात घटोत्पत्तीचे सामर्थ्य असते. घट नष्ट झाल्यानंतरचा घटाभाव घटाचे तुकडे किंवा इतर काही घटसंबंधी वस्तूंनी युक्त असतो. वंध्यापुत्राच्या अभावात असे कोणतेच विशेष नसतात. म्हणूनच नैयायिक घटापूर्वीच्या घटाभावाला प्रागभाव, घटनाशानंतरच्या घटाभावाला प्रध्वंसाभाव व वंध्यापुत्राच्या अभावाला अत्यन्ताभाव म्हणतात. घटाच्या प्रागभावातूनच घट निर्माण होतो. प्रध्वंसाभावातून किंवा अत्यन्ताभावातून नव्हे.

घटप्रागभावातूनच घट निर्माण होतो, दुसऱ्या कोणत्याच अभावातून निर्माण होत नाही म्हणून अभावातून उत्पत्ति झाल्यास वाटेल त्यातून वाटेल ते निर्माण होईल अशी भीति वाटण्याचे कारण नाही. हे उत्तर ज्याना समाधानकारक वाटत नाही त्यांचे सत्कार्यवादाने देखील समाधान होण्याचा संभव नाही. घट मातीतूनच निर्माण होतो, कापसांतून निर्माण होत नाही, कारण तो मातीतच अव्यक्तरूपाने असतो, कापसात नसतो असे सत्कार्यवादाचे सांगणे आहे. पण घट मातीतच का असतो, कापसात का नसतो असे कुणी विचारल्यास सत्कार्यवादाजवळ काय उत्तर आहे ?

कार्यकारणाची एकरूपता सिद्ध करण्यासाठी सांख्यांनी केलेले युक्तिवाद पटण्यासारखे नाहीत. कार्यकारणातले भेद ऐकांतिक नाहीत म्हणून तिकडे दुर्लक्ष केल्याने ते भेद नाहीसे होत नाहीत. ऐकांतिक भेददेखील भेदच आहेत. गुंडाळलेल्या दोरीत लंबता हा गुणधर्म नसतो. ती उकलली म्हणजे तिच्यात हा गुणधर्म येतो. उकलण्याच्या क्रियेने नवीन दोरी निर्माण होत नसली तरी जुन्या दोरीत लंबता हा नवा गुणधर्म येतो खास. अंगे पसरविल्याने कासवाला नवीन अंगे प्राप्त होत नसली तरी त्याच्या अंगात लंबता वगैरे नवे गुणधर्म अवश्य येतात. तसेच चार भोई मिळून एक नवा भोई निर्माण होत नसला तरी चार भोयांची शक्ति एकवटली जाते व तिने वेगवेगळ्या चार भोयांना जी पालखी उचलत नाही ती उचलली जाते. अर्थात् कोणत्याही नवीन कार्याला नवनिर्मिति अवश्य मानावी लागते.

भिन्नता ही कमीजास्त असू शकते. पदार्थांच्या गुणधर्मात क्ष साम्य असेल तर त्यांना एक मानावे व ( क्ष–य ) साम्य असेल तर त्यांना भिन्न मानावे



अनुक्रमणिका





असा काही नियम करता येत नाही. खुर्चीचा एखादा पाय तुटला तरी तिला खुर्चीच म्हणतात. चारही पाय तुटले तरी तिचे खुर्ची हे अभिधान लोपत नाही. फार झाले तर तिला तुटकी खुर्ची म्हणतील. खुर्ची पूर्ण जळून तिचा कोळसा झाला तर त्या कोळशाला कुणीही खुर्ची म्हणणार नाही, हे खरे असले तरी खुर्चीचा कितवा भाग जळल्याने तिचे खुर्चीपण लोपते हे निश्चित नाही. " टक्कल पडले " असे म्हणता येण्यास डोक्याचे किती केस झडावे लागतात याचा निश्चित नियम करता येत नाही. असे असले तरी धड खुर्ची व तुटकी खुर्ची, केशवान बालक व केस झडू लागलेला मध्यम वयस्क यांत काही फरकच नाही असे कुणी म्हणत नाही. तसेच घट व माती यात फारच थोडा भेद असतो असे मानले तरी त्यांना एकच मानता येत नाही.

### प्रकृति असिद्ध आहे

कार्याहून कारण जास्त अपरिमित असते. कारणाचे कारण त्याहूनही जास्त अपरिमित असते, म्हणून या कारणमालिकेच्या शेवटी असलेले अंतिम कारण सर्वथा अपरिमित असले पाहिजे हा सांख्यांचा युक्तिवाद कारणमालिकेला शेवट असलाच पाहिजे, या चुकीच्या गृहीतावर आधारित आहे. १, २, ३ या पूर्णांकांच्या मालिकेला ज्याप्रमाणे शेवट नाही—— म्हणजे शेवटचा म्हणता येईल असा कोणताच पूर्णाङ्क नाही—— त्याचप्रमाणे कारणमालिका देखील अनंत असेल व अंतिम कारण असे कोणतेच नसेल. तेव्हा जगाचे अंतिम उपादान कारण जी प्रकृति ती असिद्ध आहे.

प्रकृतीच्या तीन गुणांची कल्पना देखील निश्चित नाही. सत्त्वाची व्याख्या कधी प्रकाशित्व व कधी प्रीतिकरत्व अशी केली आहे. पण जे प्रकाशकर आहे ते नेहमी प्रीतिकर असेलच असे नाही. स्मृति प्रकाशकर असली तरी आपल्या अपमानाच्या स्मृतीपेक्षा, त्याची विस्मृतीच अधिक प्रीतिकर असते. तसेच रजाचे स्वरूप कधी प्रवृत्ति व कधी दुःख असे सांगितले आहे. पण दुःख व प्रवृत्ति यांचा नियतसंबंध नाही. अतिदुःखाने मूर्च्छा देखील येते, प्रवृत्ति होणे तर दूरच. त्रिगुणांची कल्पना याप्रमाणे संदिग्ध असल्यामुळे या त्रिगुणांची साम्यावस्था जी प्रकृति तिचे स्वरूप देखील फार संदिग्ध आहे.

### पुरुषकल्पना अनावश्यक

सृष्टीतील पदार्थांत सुख व दुःख देण्याचे सामर्थ्य आहे. यावरून सुख व दुःख यांचे अस्तित्व सिद्ध होते, पण हे सुख व दुःख पुरुष किंवा आत्मा नांवाच्या एखाद्या स्थायी पदार्थांत अनुस्यूत असते असे सिद्ध होत नाही.

सुखदुःख म्हणजे अनुकूल व प्रतिकूल भावना. पुरुषच मानला नाही तर या भावना कुणाला अनुकूल वा प्रतिकूल असतात अशी शंका येईल. तीवर उत्तर असे की भावनेची अनुकूलता वा प्रतिकूलता म्हणजे दुसरे तिसरे काही नसून ती भावना टिकावी वा संपावी अशी त्या भावनेबद्दल भावना असणे. या सर्व भावना कुणात राहतात असे विचारणे पृथ्वी कुणाच्या डोक्यावर राहते असे विचारण्यासारखे आहे.

प्रकृति व पुरुष या कल्पना मांडल्यावर त्यांच्या योगाने सृष्टि कशी निर्माण होते याचे सविस्तर वर्णन सांख्यदर्शनात आहे. पण ते सर्व खरे का मानावे याचे सयुक्तिक विवेचन सांख्यांच्या उपलब्ध ग्रंथात सापडत नाही. म्हणून त्याची चर्चा या निबंधात केली नाही.

### सारांश

( १ ) उत्पत्तीच्या पूर्वी कार्य अस्तित्वांत असते हे सांख्यांचे मत स्वीकरणीय नाही.

( २ ) प्रकृति व पुरुष यांचे अस्तित्व सिद्ध करण्यात सांख्यांना यश आलेले नाही.

### आधार

( १ ) ईश्वरकृष्ण — सांख्यकारिका
( २ ) वाचस्पति — सांख्यतत्त्वकौमुदी










तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# गोमांतक मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षीय भाषण

## (अधिवेशन ११ वे, दिनांक २९ डिसेंबर १९६२, पणजी)

गोमांतक साहित्य संमेलनाच्या अधिवेशनाचा अध्यक्ष होण्याचा दुसऱ्यांदा मान मला आपण दिला आहे याबद्दल मी आपला आभारी आणि कृतज्ञ आहे. मी कृतज्ञ आहे असे म्हणण्याचे कारण आपण माझ्यावर गोमांतकाबद्दलच्या सूचकपणे काही महत्त्वाच्या जबाबदाऱ्या टाकल्या आहेत, याची मला पूर्ण जाणीव आहे. हा मान मला दिला नसता तरी त्या जबाबदाऱ्या पार पाडणे सर्व महाराष्ट्रीयांबरोबर माझेही ते पवित्र कर्तव्य ठरते. गोमांतकात हे साहित्य संमेलन स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या कालात प्रथम भरत आहे. या निमित्ताने मी गोमांतकीय सर्व जनतेचे नितान्त अभिनन्दन करतो.

गोमांतकाच्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या यशात आपली सर्व जनता भागीदार आहे. 'सर्व जनता' या शब्दाच्या अर्थात केवळ गोमांतकीय जनता येत नाही, भारतीय जनताही येते. किंबहुना असेही म्हटले पाहिजे की भारतीय जनतेने स्वातंत्र्य मिळविले म्हणून गोमांतकीय जनतेला स्वातंत्र्याचा लढा यशाच्या कळसापर्यंत पोचविता आला. गोमांतकीय जनतेने कितीतरी तेजस्वी वीर व हुतात्मे स्वातंत्र्यदेवतेच्या आराधनेकरिता दिले आहेत. एवढ्याशा लहान प्रदेशात शेकडो नामवंत गुणवंत, समरधीर वीर पुढे आले, लढले, रणांगणात शत्रूची गोळी लागून पडले, कारावासात दीर्घ काळपर्यंत हालअपेष्टांची पर्वा न करता स्वातंत्र्यदेवतेकरिता तप आचरते झाले. त्या सर्वांना मी नम्र प्रणाम करतो.

### महाराष्ट्र व गोमांतक

गोमांतक हा महाराष्ट्राचा अविच्छेद्य भाग आहे याचे निर्णायक प्रमाण कोकणचा इतिहास होय. कोकण हा महाराष्ट्राचा व महाराष्ट्रातील संस्कृतीचा अविभाज्य भाग आहे याबद्दल इतिहासाचाच निर्णय प्रमाण मानला पाहिजे. कोकणी बोलणारी सुमारे सत्तर टक्के प्रजा महाराष्ट्र राज्यात आज राहात आहे; बाकीची तीस टक्के प्रजा गोमांतक-कारवारपर्यंतच्या पश्चिम किनाऱ्यावर पसरली आहे.

कोकणी म्हणून जी बोली आहे तिच्या भाषाशास्त्रज्ञांच्या मतांप्रमाणे तेरा शाखा आहेत. कोणतीही बोली लेखनिविष्ट करता येते त्याप्रमाणे या तेरा शाखांपैकी तीन बोली अलीकडे लिहिल्या जाऊ लागल्या आहेत. गोमांतकातील सारस्वती व खिश्चन आणि कारवारकडील सुशिक्षितांच्या बोलीचा एक प्रकार यांचा लेखनात किंवा पुस्तकात उपयोग केला जात आहे. परंतु ह्या कोकणी भाषेला शिक्षणाची, विद्येची किंवा साहित्याची स्वतंत्र भाषा असा दर्जा प्राप्त झालेला नाही. बोली किंवा उपभाषा साहित्यिक व विद्यापीठीय स्वतंत्र भाषेचा दर्जा भोगू शकते असे भाषाशास्त्र व भाषेतिहासकार मान्य करतात. म्हणून कोकणी ही मराठीची उपभाषा किंवा बोली आहे, यावरून ती स्वतंत्र दर्जाची भाषा नव्हे असे सिद्ध करण्याचे कारण नाही. उपभाषासुद्धा स्वतंत्र दर्जाच्या भाषा बनल्या अशी भारतीय व युरोपियन भाषांची अनेक उदाहरणे मिळतात.

कोकणी ही मराठीची उपभाषा आहे याबद्दल फार थोड्या भाषाशास्त्रकारांचा मतभेद आहे. डॉ. रामकृष्ण भांडारकर, ग्रीअरसन, डॉ. गुणे इत्यादि भाषाशास्त्रज्ञांनी कोकणीला मराठीची उपभाषा म्हणून गणले आहे. कोकणी ही मराठीचीच उपभाषा आहे, कोकणी ही स्वतंत्र भाषा कशी नाही याचे स्वर्गवासी विठ्ठल रामजी शिंदे यांनी सम्यक् समर्थन केले आहे ( शिंदे लेखसंग्रह, संपादक डॉ. मा. प. मंगुडकर ). डॉ. अ. का. प्रियोळकर यांनी गोमांतकाच्या भाषिक व सांस्कृतिक प्रश्नांचे ऐतिहासिक प्रमाणांच्या बळकट

आधारावर गोमांतकीय संस्कृति व कोंकणी भाषा महाराष्ट्रीय कशी आहे याचे उत्कृष्ट निःसंदेह समर्थन केले आहे. कोंकणी ही मराठीची उपभाषा असल्यामुळेच कोकणीचे प्राचीन केन्द्रस्थान असलेल्या रत्नागिरी जिल्ह्यात आज कोकणीचे संपूर्ण मराठीकरण बिनतक्रार होत आहे. भारतातील वा जगातील सगळ्याच उपभाषांचे सांस्कृतिक व विद्यापीठीय भाषेत झपाट्याने विलिनीकरण होत आहे. महाराष्ट्रातील कोंकणीसारख्याच अन्य उपभाषा – अहिराणी, खानदेशी, वऱ्हाडी, नागपुरी – वेगाने मराठीमध्ये आत्मविसर्जन करण्याच्या मार्गावर आहेत. मुंबईच्या आकाशवाणी केंद्रातून जी कोकणी आपण ऐकतो ती आणि गोव्यातील ख्रिश्चनांमधील कोकणी यांचे अंतर फार मोठे आहे. आणि ते अंतर साहित्यनिविष्ट मराठीचे व आकाशवाणीच्या कोकणीचे जेवढे आहे तेवढेच शब्दसंख्यांच्या प्रमाणात आहे, हे लक्षात ठेवले पाहिजे. कोकणी ही बोली अथवा उपभाषा असली तरी तिला साहित्याची प्रतिष्ठा व शिक्षणाचे माध्यम म्हणून स्थान देण्याचा प्रयत्न कोणी केल्यास त्याला विरोध करण्याचे कारण नाही. परंतु गोमांतकातील कोकणी बोलणाऱ्या जनतेचे शैक्षणिक प्रगतीचे साधन म्हणून कोकणीचा विशेष उपयोग होणार नाही हे एक जबरदस्त व्यावहारिक सत्य आहे. हे व्यावहारिक सत्य सारासार विवेकाच्या द्वारे गोमांतकातील जनतेला फार चांगले समजू लागले आहे. अलौकिक प्रज्ञावंतांनी अनेक शतके परिश्रमपूर्वक निर्मिलेली भाषाच शैक्षणिक भाषा म्हणून उपयुक्त ठरते. या दृष्टीने कोकणी माणसांना अखेरीस मराठीचाच आश्रय करावा लागतो व लागेल.

गोमांतकातील जनतेच्या भावी प्रगतीचा कारक असा सामर्थ्यस्रोत मुंबईशी संलग्न झाला आहे व त्यामुळेच त्याला उज्ज्वल भविष्य त्वरित साध्य करता येईल. गोव्यातील हिंदु व ख्रिश्चन यांनी मुंबईमध्ये फार महत्त्वाचे स्थान मिळविले आहे. मुंबईला भारताचे आर्थिक मस्तक म्हणून कै. गो. ग. आगरकर यांनी निर्देशिले आहे. परंतु मुंबई ही केवळ भारताची आर्थिक राजधानी नाही; मुंबईचा महिमा अन्य अनेक प्रकारांनी असामान्य आहे असे म्हणता येते. भारतातील व जगातील सर्व धर्मांचे संगमस्थान व जागतिक संस्कृतीचे अभ्यागत मंदिर म्हणून मुंबईची प्रतिष्ठा मोठी आहे. हिंदू, जैन, बौद्ध, पारशी, मुसलमान, शीख, यहुदी, ख्रिश्चन अशा सर्वधर्मीय जमाती आपल्या सांस्कृतिक व्यक्तिमत्त्वासह आनंदाने मुंबईत नांदत आहेत. आधुनिक पाश्चात्य संस्कृतीचे जोमदार वारे मुंबईवर पोचतात व नंतर भारतात अन्यत्र संचार करतात. सुधारणेच्या व संस्कृतीच्या उच्च प्रवृत्तींचा आविष्कार मुंबईत होत आहे, अशा त्या मुंबईचा अविभाज्य संबंध गोमांतकाशी आहे. भूतकाळाचा इतिहास ज्याप्रमाणे कोकण व महाराष्ट्र यांची एकात्मता सिद्ध करतो त्याचप्रमाणे वर्तमानकाळाच्याही सामाजिक घडामोडी त्याच एकात्मतेचे समर्थन करीत आहेत. या संदर्भात तर्कसरणीप्रमाणे मी असे विधान मांडतो की कोकण महाराष्ट्राचा भाग आहे; गोमांतक कोकणचा भाग आहे; म्हणून गोमांतक महाराष्ट्राचा भाग आहे. या विधानावरून असे मान्य केले पाहिजे की गोमांतकाला महाराष्ट्र राज्यात सामील होणे भाग आहे.*

## चिनी आक्रमण

गोमांतक बंधमुक्त होऊन एक वर्ष पुरे होते न होते तोच भारतावर नवे परकीय आक्रमणाचे संकट प्राप्त झाले आहे. त्यामुळे आपले अंतर्गत प्रादेशिक प्रश्न हे काही काळ मागे ठेवणे प्राप्त झाले आहे. अंतर्गत प्रादेशिक प्रश्न हे भारतीय एकात्मतेला बाधक होतील की काय अशी शंका राष्ट्रीय नेत्यांना पूर्वी वाटत होती, व अजूनही वाटत आहे. परंतु राष्ट्रावर संकट आल्याबरोबर राष्ट्रीय एकात्मतेने आपले सामर्थ्यशाली भव्य रूप प्रकट केले. हे नवे आक्रमण म्हणजे राष्ट्रावरील महान संकट आहे; त्याचे स्वरूप फार गंभीर

* महाराष्ट्र राज्यात गोमांतक सामील व्हावा या उद्देशाने प्रेरित होऊन काही महिन्यांपूर्वी मी स्वतः व श्री. ग. त्र्यं. माडखोलकर अशा दोघांनी श्री. काकासाहेब कालेलकर यांच्याशी राजकीय उच्च पातळीवरून चर्चा केली. त्यासंबंधी काही अर्धवट बातम्या वृत्तपत्रात येऊन श्री. माडखोलकर व श्री. कालेलकर यांच्यावर विनाकारण टीका झाली. प्रत्यक्ष आमचा प्रयत्न जास्तीत जास्त सामोपचाराने राजकीय एकात्मतेसंबंधी गोष्टी घडाव्यात अशा हेतूने चालला होता.






अनुक्रमणिका





आहे. एका अर्थी तुलनात्मक दृष्टीने पाहता ब्रिटिश साम्राज्यशाहीपेक्षा अधिक घातक असे हे लाल साम्राज्यवादाचे आक्रमण आहे. ब्रिटिश साम्राज्यवादाचे आक्रमण हे आर्थिक शोषण करणारे होते. हे नवे आक्रमण केवळ आर्थिक शोषण करून थांबणार नाही, ते सर्वंकष आक्रमण आहे. त्यात येथील राष्ट्रीय संस्कृति व मानवी स्वातंत्र्य या सर्वांचा अपहार करण्याचा उद्देश गर्भित आहे.

### संकल्पशक्ती व्यक्त करणारी संस्कृति

युद्धसाहित्याची निर्मिति व युद्धार्थ सज्जता यांची भारताला सर्वात मुख्य गरज आहे. अन्न, वस्त्र, वाहतुकीची साधने, यंत्रोत्पादक धंदे, शस्त्रोत्पादक धंदे इत्यादि गोष्टींचा ज्याप्रमाणे युद्धसाहित्यात अंतर्भाव होतो त्याचप्रमाणे साहित्याचाही युद्धसाहित्यात अंतर्भाव होतो. वैचारिक प्रेरणा आणि भावनात्मक स्फूर्ति उत्पन्न करणारे साहित्य हा युद्धसाहित्याचा भाग असतो. निर्धाराची व इच्छाशक्तीची प्रबोधने अशा साहित्याने होतात. याबाबतीत भारतीय मनाचे नीट अध्ययन केले तर असे दिसून येते की, संकल्पशक्तीला ( will force ) येथे कमी महत्त्व आहे. भाषेत व साहित्यात येणारे जीवनातील साफल्याचे दर्शक वाक्प्रचार असे सुचवितात की, इच्छाशक्तीला फार कमी महत्त्व आहे. उदाहरणार्थ 'आमचे स्वप्न साकार झाले' अशा अर्थाचे आलंकारिक वाक्य सर्व भारतीय भाषांमध्ये वारंवार वापरल्याचे आढळते. स्वप्न हे अभावितपणे निर्माण झालेले असते. 'आमचा संकल्प ( will ) सिद्धीस गेला' असा प्रयोग क्वचित् आढळतो. नियतीशी झगडणारा माणूस मृत्यूचा स्वीकार करतो परंतु झगडा सोडत नाही. अशा तऱ्हेच्या इच्छाशक्तीला प्राधान्य देणारी सांस्कृतिक परंपरा पाश्चात्य संस्कृतीला लाभलेली आहे. नाट्यातील उच्चतम कलाकृति म्हणजे दुःखान्तिका, पाश्चात्य मनुष्याला निर्माण करता आली. पाश्चात्य जनतेने तिचे हजारो वर्षे रसिकतेने स्वागत केले. भारतीय संस्कृतीच्या प्रकृतीला दुःखान्तिका यशस्वी रीतीने निर्माण करता येत नाही व सोसतही नाही. याचे कारण नियतीवर मात करणारा इच्छाशक्तीचा प्रबल स्रोत येथील संस्कृतीने निर्मिलेला नाही. संकल्पाचा महिमा व अदम्य इच्छाशक्तीचे श्रेष्ठत्व भारतीय संस्कृतीला जेव्हा जनहृदयात स्थापन करता येईल तेव्हाच आक्रमकाचा पराभव करता येईल.

### मार्क्सवाद हा विचारस्वातंत्र्याचा धोका

साहित्य संमेलन हे राजकीय विचारांचे किंवा राजकारणाचे स्थान नाही. हे ललित व वैचारिक साहित्याच्या प्रणेत्यांचे पीठ आहे. येथे राजकीय विचार अप्रस्तुत ठरेल. परंतु या आक्रमणाच्या योगाने सूचित होणारा विचारस्वातंत्र्याचा प्रश्न या साहित्याच्या व्यासपीठाशी अत्यंत निगडित आहे. साहित्य संमेलनास विचारसंग्राम व विचारांकरिता संग्राम यापासून अलिप्त राहाता येत नाही. हे चिनी आक्रमण भारतावर हिमालयाच्या पर्वतराजींवरून अनेक वर्षे म्हणजे इ. स. १९५४ पासून सुरू झाले व गेल्या ऑक्टोबरच्या २० तारखेस त्याने उग्ररूप धारण केले आहे. ह्या आक्रमणाच्या पाठीमागील प्रेरक शक्ति लाल साम्राज्यवाद होय. या लाल साम्राज्यवादाची वैचारिक बैठक कम्युनिझमची आहे. मार्क्सवाद, लेनिनवाद, स्टालिनवाद व माओवाद हे त्या कम्युनिझमचे अनेक अंश आहेत. कार्ल मार्क्सचा कम्युनिझम हा विचाराच्या स्वरूपात किंवा ध्येयवादाच्या स्वरूपात शब्दांच्या किंवा पुस्तकांच्या द्वारे जगात विचारवंतांच्या परिसरात जेव्हा अवतरला तेव्हा त्याने काही विचारवंतात वैचारिक क्षोभ निर्माण केला; समाजातील दलित वर्गांच्या कळवळ्याने सेवेची दीक्षा घेतलेल्या काही समाजसेवकात त्याने वैचारिक क्रांति केली; समाजरचना मुळापासून बदलली पाहिजे, त्याशिवाय सामाजिक अन्याय व दलितांची दुःखे समूळ नष्ट होणार नाहीत; समता व स्वातंत्र्य यांचे नवे मानवी जग निर्माण करणे म्हणजे क्रांति करणे ही आधुनिक मानवाची मूलभूत गरज आहे; त्याशिवाय मानवतेच्या ऋणातून मनुष्य मुक्त होणार नाही; अशा ध्येयवादाने प्रेरित झालेल्या युरोपियन आंदोलनाच्या नेत्यांमध्ये व अनुयायांमध्ये धर्मांतरासारखे मूलगामी विचारपरिवर्तन करण्याची जबरदस्त शक्ति मार्क्सवादात आतापर्यंत होती. ही वैचारिक क्रांतीची सात्त्विक प्रेरणा रशियन क्रांतीनंतर घटत चालली; तिला कायमची ओहटी लागली. हा विचार नैतिक आणि सत्यसंशोधनाच्या सामर्थ्याने प्रभाव गाजवेनासा झाला आहे. सत्यावर प्रकाश टाकणे हेच विचाराचे मुख्य कार्य होय. परंतु हा कम्युनिझमचा










विचार किंवा मार्क्सवादी विचार आता शस्त्रधारी बनला आहे, तो शस्त्र घेऊन आक्रमण करीत आहे. विचार हा जेव्हा शस्त्रधारी बनतो व अन्य विचारांचे दमन शस्त्राने करू लागतो तेव्हा त्याचे वैचारिक पावित्र्य संपलेले असते. एवढेच नव्हे तर तो सत्याचाच शत्रु बनतो. विरोधी विचारांच्या शुद्ध निःशस्त्र संग्रामातच सत्याचा साक्षात्कार होतो, असे मानवी सत्यसंशोधनाचा इतिहास सांगतो. मार्क्सवादी माणसांचा विचारावरील शुद्ध विश्वास नष्ट झाला आहे, शस्त्रावरील विश्वास ही या गोष्टीची निशाणी आहे. एखाद्या विचारसरणीचा आपल्या सत्यशोधक शक्तीवरील विश्वास म्हणजे आत्मविश्वास होय. मार्क्सवादी विचारसरणीने आता हिंसक, मानव्यविरोधी व कुटिल राजनीतीचे आसुरी रूप धारण केले आहे. चिनी कम्युनिझम हा त्या आसुरी शक्तीचा एक अवतार आहे. साहित्यिक, कवी, कलाकार, तत्त्वचिंतक, शास्त्रज्ञ किंवा विज्ञानसंशोधक यांना कायम बंधनात टाकणारा व टाकू इच्छिणारा असा हा कम्युनिझमचा विचार आहे.

हा विचार शस्त्रधारी होऊन राक्षसी संहार करावयास उद्युक्त होतो; याचा पुरावा जगातील सर्वश्रेष्ठ शस्त्रधारी कम्युनिस्ट म्हणजे रशियाचे पंतप्रधान क्रुश्चेव्ह यांनीच दिला आहे. स्टालिनच्या अगदी सन्निध राहून त्याचे जीवन पाहणाऱ्या व स्टालिनच्या पदावर आलेल्या माणसाने स्वखुषीने दिलेला हा जबाब आहे. जो विचारस्वातंत्र्याचा शत्रू तो व्यक्तिस्वातंत्र्याचा शत्रू होय; कारण विचाराची निर्मिति व्यक्तिगत असते, समुदायगत नसते, म्हणून विचारस्वातंत्र्य याचा गर्भितार्थ व्यक्तिस्वातंत्र्य होय. कम्युनिझमचा विचार हा विचारस्वातंत्र्याचा शत्रू आहे असे अनुमान अनेक जागतिक विचारवंतांनी रशियन राज्यक्रांतीच्या प्रारंभापासून केले आहे. रशियन राज्यक्रांतीच्या प्रभावाने प्रथम काही काळपर्यंत जगातील मोठमोठे विचारवंत, साहित्यिक व कलाकार भुलून गेले होते; पृथ्वीवर स्वर्गाचे राज्य निर्माण करणारा हा ध्येयवाद प्रत्यक्ष ईश्वरच आहे अशी उन्मादक श्रद्धा अनेक विचारवंत कवींमध्ये व साहित्यिकारांमध्ये उत्पन्न झाली होती. परंतु हा ईश्वर नव्हे, हा एक कल्पनेचा भयानक भ्रम आहे, अशा तऱ्हेचे सत्यदर्शन परिस्थितीने त्यांना धक्का मारून घडवून आणले. ( पहा– 'God that failed' )

मार्क्सवादी विचारसरणी किंवा कम्युनिस्ट ध्येयवाद ही एक आधुनिक युगातील सर्वात सामर्थ्यशाली अशी विचारसरणी किंवा ध्येयवाद आहे. या विचारसरणीला किंवा ध्येयवादाला हे सामर्थ्य कोठून प्राप्त झाले? बुद्धधर्म, ख्रिश्चन धर्म, किंवा मुसलमान धर्म यांनाही एका काळी विस्ताराचे सामर्थ्य प्राप्त झाले होते. त्यावेळी मानवी विचारपद्धति ही श्रद्धाधिष्ठित होती. कोणताही विचार साधकबाधक प्रमाणांनी तपासला पाहिजे अशी प्रवृत्ति त्या युगाला लाभली नव्हती. पारलौकिक अस्तित्वावरील अढळ श्रद्धा हा त्या युगाचा धर्म होता, म्हणून धर्मसंस्था त्या काळात शक्तिशाली बनली. ज्या युगात मार्क्सवादी ध्येयवाद अस्तित्वात येऊन प्रभावी बनला ते हे आधुनिक युग विचारस्वातंत्र्याचे व बुद्धिवादाचे युग मानले जात आहे. परलोक हा मानवी बुद्धीस अगम्य आहे म्हणून त्याबद्दलचा विचार तपासणे हे सूक्ष्म श्रद्धाबुद्धीचेच कार्य आहे. मानवी सूक्ष्म भावना आणि गूढ श्रद्धा यांना बुद्धिवादी युगातही अवसर असतो. परंतु कम्युनिझमचा ध्येयवाद ही इहलोकवादी विचारसरणी आहे. इतिहास, सामाजिक शास्त्रे, भौतिक विज्ञान व विशेषतः अर्थशास्त्र यांच्या आधाराने व अनुभव, प्रयोग व तर्कबुद्धि यांच्या योगाने तपासता येण्यासारखा हा विचार आहे. त्यांतील अनेक सिद्धान्त व प्रमेये संदिग्ध ठरू शकतात, बाधित करता येतात किंवा निरर्थक कल्पनाजाल म्हणून टाकता येतात. त्यातील सत्य वा असत्य वा संदेहास्पद असे काय आहे याबद्दल योग्य चर्चा विद्वान करू शकतात. असे असूनही ख्रिश्चन धर्म किंवा मुसलमान धर्म हे ज्याप्रमाणे प्राचीन युगात व मध्ययुगात श्रद्धायुक्त अंतःकरणाने मानवी जमातींनी व राष्ट्रांनी अंगीकारले, त्याचप्रमाणे आज पूर्व युरोपातील अनेक सुसंस्कृत राष्ट्रे, रशिया व त्याची अंकित अशी आशियातील राष्ट्रे, त्याचप्रमाणे जगातील सगळ्यात मोठ्या लोकसंख्येचे व विशाल प्रदेशाचे चिनी देश यांनी श्रद्धापूर्वक अंगीकार केला आहे. मार्क्स– लेनिनवादासंबंधी साधकबाधक चर्चा करणे, त्याच्यावर बौद्धिक समीक्षा करून त्याची वैचारिक अस्वीकार्यता ठरविणे ही गोष्ट वधाच्या किंवा दीर्घ कारावासाच्या किंवा इतर अनेक प्रकारच्या देहदंडनात्मक यातनांच्या, सामाजिक बहिष्काराच्या, हद्द-



अनुक्रमणिका






पारीच्या किंवा प्रचंड निंदा-प्रहारांच्या शिक्षेस त्वरित पात्र ठरते व असा समीक्षक जनताद्रोही ठरून त्यास निंदा व विटंबना सोसावी लागते. मार्क्स-लेनिनवाद व विशेषतः मार्क्स-लेनिनवाद स्वीकारलेल्या राज्यकर्त्यांची विचारसरणी, श्रद्धापूर्वक न स्वीकारणारा व मतभेद दाखविणारा जनताद्रोही म्हणून सर्व प्रकारच्या सरकारी रोषास व दंडनास पात्र ठरतो. ख्रिश्चन, मुसलमान, बौद्ध, ताओ, कन्फ्यूशसपंथ इत्यादि सर्व धर्मांचा शस्त्राच्या दहशतीने विनाश करणे व प्राचीन सर्व परंपरागत संस्कृतींचा विलय करणे असा मार्क्स-वादी कम्युनिस्ट राष्ट्रांचा मुख्य उद्देश आहे. सर्व जग कम्युनिस्ट करणे हा आजच्या सर्व कम्युनिस्ट राष्ट्रांचा व कम्युनिस्ट पक्षांचा मुख्य उद्देश आहे. कम्युनिस्ट राज्यात मार्क्स-लेनिनवादास शरण गेलेल्या व स्वतःच्या प्रामाणिक बुद्धीने त्याचा अर्थ करणाऱ्या भाष्यकार व्यक्तींनाही धोका असतो. मार्क्स – लेनिनवादाचा अर्थ सुद्धा सत्ताधारी पक्ष सांगेल तोच मानावा लागतो. निराळा अर्थ करणारे विविध प्रकारच्या निंदेस पात्र होतात. कम्युनिस्ट सत्ताधारी पक्ष = मार्क्सलेनिनवादी = जनता, असे समीकरण तेथे आहे. सत्ताधारी पक्षाशी विरोध म्हणजेच जनतेशी विरोध. जनता कम्युनिस्ट राज्यकर्त्यांविरुद्ध बंड करू लागली तर ती जनता नव्हे; ते बंड प्रतिगामी व्यक्तींचे व प्रतिगामी शक्तींचे ठरविले जाते. कम्युनिस्ट राज्य-संस्था हे मानवाच्या वैचारिक स्वातंत्र्यावर संकट आहे याची जाणीव विचारवंत व कलावंत यांनी करून घेतली पाहिजे. ज्या राज्यपद्धतीत राज्याच्या निर्णयावर व राज्याने स्वीकारलेल्या विचारसरणीवर टीका करण्याचा अधिकार लोकांस नाही, तेथे वैचारिक जीवन विकसित होणे अशक्य होय. कारण विचारस्वातंत्र्य हे विचाराचे अधिष्ठान होय. ते अधिष्ठानच कम्युनिस्ट राज्यामुळे नष्ट होते. विचाराचे मार्ग व विचाराचे नवे नवे स्रोत त्यामुळे नष्ट होतात.

ह्या आधुनिक बुद्धिवादी युगात अशाप्रकारचा विचाराचा व पर्यायाने सत्याचा शत्रू का वृद्धिंगत होत आहे हा प्रश्न अत्यंत गुंतागुंतीचा व न सुटणाऱ्या कोड्यासारखा आहे. त्या प्रश्नाचा संबंध सामाजिक मानसशास्त्राशी अत्यंत निगडित आहे. एक गोष्ट अगदी स्पष्ट आहे की, कम्युनिस्ट राज्यक्रांतीचे प्रदेश म्हणजे आधुनिक बुद्धिवादी युगाचा विशेष स्पर्श न झालेलेच देश आहेत. यांत्रिक सुधारणा व वैज्ञानिक क्रांति होऊन औद्योगिक विकास झालेल्या इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, युनायटेड स्टेटस् इत्यादि राष्ट्रात कम्यु-निस्ट क्रांति होऊ शकली नाही. जेथे जेथे औद्यो-गिक क्रांति होऊन मोठा व संघटित कामगारवर्ग निर्माण झाला तेथे तेथे तथाकथित कामगार-क्रांतीचे कधीही स्वागत झालेले नाही. मागासलेल्या देशात मार्क्सवाद रुजल्यामुळे तेथे त्याला मध्ययुगीन धर्म-ग्रंथाचे स्वरूप आले व कम्युनिस्ट राज्य मध्ययुगीन चर्च म्हणजे धर्मराज्य बनले. कम्युनिझमची मौलिक किंवा सर्वांगीण आलोचना करणे म्हणजे मोठा गुन्हा होय, असे तेथे ठरते. प्रस्थापित राज्याच्या मार्गदर्शना-खाली व नियंत्रणाखाली साहित्य, नृत्य, चित्र, नाट्य, संगीत, काव्य, चरित्र, इतिहास, तत्त्वज्ञान व विज्ञान यांचे लेखन व प्रकाशन तेथे चालते. राज्यकर्त्यांचा मार्क्सलेनिनवादी, माओवादी निकषच सर्व विद्यांची व कलांची ग्राह्याग्राह्यता ठरवतो. विचारपद्धतीची तत्त्वे हाच विचाराचा निकष होय, हा सिद्धान्त कम्युनिस्ट राज्यात बाधित मानलेला आहे. कारण तो सिद्धान्त पिळवणूक करणाऱ्या वरिष्ठ वर्गाचा सिद्धान्त म्हणून दण्डनीय ठरला आहे. कोणताही विचार सत्य की असत्य याची कसोटी कम्युनिस्ट राज्यकर्त्यांची आवड-निवड हीच तेथे ठरते.

चीनचा वरिष्ठ नेता व राज्यकर्ता माओ-त्से-तुंग याने इ. स. १९५६ मध्ये सर्व लेखकांना, कवींना, ग्रंथकारांना आवाहन देऊन सांगितले की, " विविध विचारसरणींचा आविष्कार होणे आवश्यक आहे. विविध प्रकारची शेकडो फुले फुलवू द्या ! ( Let hundred flowers bloom ). नाना विचारपंथ निघू द्या ! " या स्वातंत्र्याच्या घोषणेने लक्षावधी विचारवंत, शिक्षक, प्राध्यापक, प्राचार्य, कवी, पंडित यांनी प्रस्थापित कम्युनिस्ट राजवटीच्या विचारांचा समाचार घेण्यास प्रारंभ करून त्याचा उच्चांक गाठला. माओ–त्से-तुंगची विचारस्वातंत्र्याची घोषणा हे एक मोहजाल होते. त्यात हजारो टीकाकार सापडले. विरोधी विचारांच्या लोकांचे काटे मुळापासून नष्ट करण्याकरिता ही युक्ती चीनच्या कम्युनिस्ट राज्यकर्त्यांनी उपयोगात आणली. विचारवंत लेखक हा सत्ताधारी राज्यकर्त्यांचा











दास बनविणे, हा मानवी दास्याचा अंत करण्याची प्रतिज्ञा करणाऱ्या कम्युनिस्ट राजवटीचा सर्वव्यापी शिरस्ता झाला आहे.

## कम्युनिस्ट विचारसरणीच्या – समीक्षेची आवश्यकता

कम्युनिझमची सर्वांगीण समीक्षा जेथे अगोदर झाली अशा प्रगत देशांमध्ये कम्युनिझम विस्तार पावू शकत नाही. तो एक विशिष्ट मर्यादित कालखंडातील म्हणजे युरोपच्या १९ व्या शतकातील सामाजिक परिस्थितीत उत्पन्न झालेला विचार आहे. प्रत्येक मानवी विचार वा उच्च विचारसरणी ही परिस्थितीने मर्यादित असते. त्यामुळे मर्यादित प्रमाणातच त्यात सत्यांश राहतो. त्यात संभवणारी असत्ये शोधून काढणे हे एक मुख्य मानवी कर्तव्य आहे. चिनी कम्युनिस्ट हुकूमशाहीचे आक्रमण थोपविण्याच्या उपायांपैकी कम्युनिस्ट विचारसरणीचे संशोधन करणे हे विचारवंतांचे व साहित्यिकांचे सद्यःस्थितीतील आद्य कर्तव्य आहे. मानवी संस्कृतीच्या विकासाचा व सत्यसंशोधनाचा जिवंत तेजस्वी स्रोत शस्त्राने अडविणारा कम्युनिझमचा विचार आहे. कम्युनिझम सशस्त्र होऊन जेव्हा उभा राहतो तेव्हा त्याचे विचार हे रूप नष्ट होते; ती एक क्रूर व विकृत अंधःश्रद्धा बनते. हेच सत्य साहित्यिकांनी व विचारवंतांनी जनतेस पटविण्याचे कार्य केले पाहिजे. साहित्यिकांनी आपले साहित्य राजकारणाचे साधन बनवावे असे मला सांगावयाचे नाही. साहित्यिकाचे व कलाकाराचे मूलभूत स्वातंत्र्य धोक्यात येऊ नये याकरिता मार्क्सवादी विचारसंप्रदायाची तपासणी करून त्यातील सत्ये व भयस्थाने यांचे दर्शन जनतेला करून दिले तरच जनता अधिक दृढ निश्चयाने आपल्या राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या रक्षणार्थ अधिक सज्ज राहील. शत्रूशी चाललेले युद्ध जिंकावयाचे असेल तर शत्रू कसा आहे हे समजावून घेतले पाहिजे. शत्रू कसा आहे हे समजावून घेणे व देणे हे विद्यापीठांचे, लेखकांचे, विद्यावंतांचे, विचारवंतांचे व साहित्यिकांचे मुख्य कर्तव्य आहे.

## भारतीय विचारांची समीक्षाही– अत्यंत आवश्यक

मार्क्सवादाच्या समीक्षेबरोबरच भारतास आत्मसमीक्षेची गरज आहे. स्वतःचा विचारही भारतीयांनी तपासला पाहिजे, असे हे चिनी आक्रमण सूचित करीत आहे; फार मोठा इशारा या आणीबाणीच्या परिस्थितीने आपणास दिला आहे. भारताच्या जागतिक किंवा आंतरराष्ट्रीय राजकारणाची मीमांसा करण्याचा हा प्रसंग नव्हे. त्याची मूलगामी मीमांसा भारतीय राजकारणी विचारवंतांनी व राज्यशास्त्रज्ञांनी करावी. कितीही आत्मवंचना केली तरी सत्य इतके प्रखर आहे की, ते आत्मपरीक्षण करावयास भाग पाडते. आमचे राजकारण, समाजकारण व सर्व प्रकारच्या वैचारिक व कलात्मक प्रवृत्ती यांच्या मुळाशी असलेल्या आमच्या श्रद्धेची व विचारसरणीची तपासणी करणे अपरिहार्य झाले आहे. भारताच्या युगानुयुगाच्या श्रद्धा तपासल्या पाहिजेत. आमचे सर्वात वरिष्ठ नेते कबूल करतात की, "आम्ही काही एका, वस्तुस्थितीपासून दुरावलेल्या, कृत्रिम विचारविश्वात वावरत होतो" म्हणजे वस्तुस्थितीला सोडून असलेले विचार राष्ट्राला मार्गदर्शन करीत होते, म्हणूनच फार मोठ्या संकटाला येथे वाव मिळाला. या विचारांची बैठक बदलणे आवश्यक आहे. भारताच्या भूतकाळाचा वैचारिक वारसा सुद्धा अग्निपरीक्षेस लावणे आवश्यक आहे. आमचा जो भूतकाळाचा अभिमानास्पद मानलेला वारसा आहे त्यात आमच्या दौर्बल्याचीही कारणसामग्री साठविली आहे. विश्वशांतीच्या प्रस्थापनेचा आमचा ध्येयवाद वस्तुस्थितीच्या समीक्षेवर म्हणजे सत्यावर आधारलेला नाही. ती एक श्रद्धा आहे. मानवाच्या ठिकाणी सत्प्रवृत्ति व असत्प्रवृत्ति या दोन्हीही राहतात. म्हणून विश्वशांतीचा ध्येयवाद हा असत्प्रवृत्तीपासून प्राप्त होणाऱ्या कायम धोक्यात असतो, हे सत्य आम्ही ओळखले पाहिजे. विश्वशांतीचा ध्येयवाद आमच्या अहिंसावादाचे फलित आहे. अहिंसावाद हा एक नैतिक आदर्शवाद आहे. हा आदर्शवाद नीट संभाळून वापरला नाही तर अहिंसावादी मोठ्या हिंसेला ओढवून घेतो व त्यामुळे त्या हिंसेस जबाबदार ठरतो. अहिंसावादी एक हिंसा टाळतो व अगणित हिंसेची परिस्थिति निर्माण करतो. कोणत्याही आदर्शवादाची हीच स्थिति आहे– किंबहुना आदर्शवाद अपूर्ण किंवा एकांगी असतो–त्याची वस्तुस्थितीशी म्हणजेच सत्याशी आणि व्यवहार्यतेशी सांगड घालणे आवश्यक ठरते. तत्त्वे आणि व्यवहार यांचा सांधा कायम राखणे हे आवश्यक असते.







सगळ्या तत्त्वांची व सिद्धान्तांची कसोटी अखेर व्यवहारातच होते. व्यवहारामध्ये यशस्वी न होणारी व अपयशास कारण होणारी तत्त्वे आभासमय असतात.

भारतीय राजकारणात अहिंसावादाचा महान् प्रयोग म. गांधींनी केला व मर्यादित प्रमाणात त्यास यश आले. या यशाचा अर्थ समजण्यास ब्रिटिश उदारमतवादी राजनीतीचाही संदर्भ अवश्य ध्यानात घेतला पाहिजे. म. गांधींचे अहिंसात्मक राजकारण हा एक अत्यंत सौम्य उपाय होता. तो उपाय हुकूमशाही ( totalitarian ) शक्तीपुढे निष्प्रभ व निष्फळ झाला असता. लक्षावधी निःशस्त्र लोकांची निर्घृण कत्तल करणारे, किंवा जमातींना, राष्ट्रांना व संस्कृतींना उध्वस्त करणारे चंगीझखान, तैमुरलंग, नादिरशहासारखे असुर इतिहासात झाले आहेत. हिटलर व स्टालिन यांची उदाहरणे वर्तमान पिढीच्या नजरेसमोर ताजी आहेत. अहिंसा व विश्वशांती या आदर्शांतील वैगुण्य व तर्कदोष यांचा परिहार करण्याकरिता अहिंसातत्त्वापेक्षा अधिक मूलगामी दुसरा महत्त्वाचा आत्मस्वातंत्र्याचा आदर्शवाद जमेस धरला पाहिजे; आत्मस्वातंत्र्याचे रक्षण हे मानवी मूलभूत कर्तव्य होय व त्याकरिता सर्वस्व पणाला लावण्याची तयारी माणसाने केली पाहिजे, हा तो आदर्शवाद होय.

विश्वशांतीचे ध्येय व अहिंसा हा भारतीय संस्कृतीचा वारसा आहे. तो वारसा आमच्या अनेक सहस्र वर्षांच्या इतिहासातील पराभवाची कथा रचित आला आहे; असे कठोर आत्मनिरीक्षण केल्याने प्रत्ययास येते. अहिंसावाद आत्मस्वातंत्र्यवादाचा उपसिद्धान्त म्हणून न मानल्यामुळे तो पराभवास कारण झाला. भारताबोहरून जे जे सुसंस्कृत, अर्धसंस्कृत व रानटी लोकांचे हल्ले आले ते ते विजयी झाले आहेत. इराण, ग्रीक, शकस्थान, मध्यआशिया व युरोप इकडून गेल्या २४०० वर्षांत क्रमाने जे जे हल्ले आले ते ते आमच्या पराभवास व पिछेहाटीस कारण झाले आहेत. अहिंसेच्या ध्येयवादामुळे आम्ही असंघटित व असज्ज असेच राहिलो. भारतीय समाज क्षात्रधर्मी समाज राहिला नाही. क्षात्रधर्म हा वस्तुतः जगातील सर्व विजयी व प्रभावी राष्ट्रांचा राष्ट्रधर्म झालेला आहे. उलट क्षात्रधर्म हा लहानशा जमातीचा कुलपरंपरागत धर्म म्हणूनच आम्ही त्याला स्थान दिले. क्षात्रधर्म हा राष्ट्रधर्म न मानल्यामुळे जातिबद्ध समाज अस्तित्वात आला. आमची जातिबद्ध समाजव्यवस्था शाश्वत कालपर्यंत असंघटित किंवा शिथिल अतएव दुर्बल राहिली आहे. या जातिसंस्थेचे तात्त्विक समर्थक जे मनु इत्यादि राजर्षी ते तत्त्वतः अहिंसावादी होते. राजर्षींच्या वंशातच अहिंसावादाचे सर्वश्रेष्ठ द्रष्टे महावीर व भगवान बुद्ध हे जन्मले. भीष्मांचा आणि कृष्णांचा क्षात्रधर्म सुद्धा अपरिहार्य म्हणून व अनासक्तीनेच शस्त्रग्रहणास उद्युक्त होतो. कृष्णाच्या अंतर्मनातील अहिंसावादाचे चित्र अर्जुनाच्या मुखाने गीतेच्या पहिल्या अध्यायात प्रकट झाले आहे. पहिला अध्याय वरवर पाहता अर्जुनाचा विचार सांगतो परंतु त्यात कृष्णाची मनःस्थिति परावर्तन पावून प्रतिबिंबित झाली आहे म्हणून अर्जुनाच्या आक्षेपाचे निरसन भगवद्गीतेत कोठेही सापडत नाही. युद्धाचे सामाजिक दुष्परिणाम अर्जुनाने वर्णिलेले आहेत ते तसेच खरे गृहीत धरून कृष्णाने नंतरचे उत्तर दिले आहे.

क्षात्रधर्म हा मानवधर्म आहे व त्यातच वस्तुवाद आणि आदर्शवाद यांची सांगड घालता येते. क्षात्रधर्म हा वीराचा धर्म होय. आत्मसमर्थनाकरिता आत्मविसर्जनास जो तयार असतो तोच वीर होय. राज्यसंस्थेचा इतिहास असे सांगतो की, अधिकात अधिक सामाजिक अहिंसेची स्थापना शस्त्रधारी शूरांनी केली आहे. दीनदुर्बलांचे रक्षण आणि समाजातील सर्वविनाशक अशा अंतर्विग्रहाचा बंदोबस्त करणारा न्याय शस्त्रधारी धीर पुरुषांनीच स्थापिला आहे. आतापर्यंतचा इतिहास असे सांगतो की, निःशस्त्र अहिंसावादी पराभूत होऊन नष्ट होतात किंवा त्यांच्या संस्थांची व तत्त्वांची जोपासना करणारे सम्राट तरी उत्पन्न व्हावे लागतात. शांतीचे व अहिंसावादाचे पुरस्कर्ते, प्रेषित व त्यांचे अनुयायी सामान्य जनांचे सशस्त्र आक्रमकापासून रक्षण करू शकत नाहीत किंवा त्यांना आत्मरक्षणार्थ संघटितही करू शकत नाहीत. त्यांच्या डोळ्यादेखत सशस्त्र आक्रमक गावांचा, नगरांचा व प्रदेशांचा विध्वंस करीत जातात व त्यांच्या अहिंसेच्या व शांतीच्या पवित्र प्रार्थना-संगीताने गुंगलेली प्रजा देशोधडीला लागते. आत्मस्वातंत्र्याचा रक्षक सशस्त्र शांतिवीर हाच या जगातील अहिंसेच्या व शांतीच्या मार्गाचा पालनकर्ता ठरू शकतो.

आत्मसमर्पणास तयार होणारा अहिंसक वीरांचा समुदाय वा समाज अजून पृथ्वीतलावर निर्माण झालेला नाही. असे मोठमोठे समुदाय अहिंसात्मक प्रतिकार करून जुलमी आक्रमकापुढे शरणागति न पत्करता मृत्यूस आलिंगन जेव्हा देऊ लागतील तेव्हाच पुनः निरुपाधिक व विशुद्ध असा अहिंसावादाचा आदर्श हा आक्रमकाचे हृदयपरिवर्तन करून विजयी होऊ शकेल. परंतु अशा प्रकारची सामाजिक स्थिती ही काल्पनिक आहे. मनुष्य हा निसर्गतःच साधनवादी आहे. शस्त्र हे साधन वापरूनच तो अन्यायाचा प्रतिकार करण्यास सामान्यपणे सज्ज होऊ शकतो. त्याच्या नैतिक श्रद्धेमध्येच अहिंसा हे आत्यंतिक मूल्य म्हणून प्रत्ययास येऊ शकते. परंतु हिंसकाची हिंसा करूनच तो आत्मरक्षण करण्याचा प्रयत्न करतो. दास्य पत्करणार नाही, अशी श्रद्धा ही निसर्गतःच मानवी हृदयात वसत आहे. या श्रद्धेच्या प्रेरणेने केलेल्या संग्रामातील विजय वा पत्करलेल्या विनाशातील दुःखान्तिका या जीवनाच्या दोनच बाजू ज्या ज्या मानवांना किंवा राष्ट्रांना दिसू शकतात ते त्यांचे दर्शन हे जीवनातील अत्युच्च नैतिक सत्याचे दर्शन होय; आधुनिक महाकाव्याचा हाच विषय होऊ शकतो. निरुपाय वा भीतिग्रस्त होऊन शरण जाणाऱ्या मानवाचे जीवन आणि निर्धाराने प्रतिकार करून पतकरलेले मरण या दोन्ही जीवनकथाच होत. परंतु शूरांच्या दुःखान्तिकांचे दर्शन घेणारे काव्य व नाट्य ललित साहित्याचा आदर्श होऊ शकतो.

## विचार व साहित्य

हा विचार येथे मी सांगत आहे याचे कारण विचार व साहित्य यांचा शाश्वत सहभाव असतो, हे होय. ललितसाहित्याशी या विचारप्रपंचाचा काय संबंध असा प्रश्न निघू शकतो. विचारमूल्याशिवाय साहित्याला स्वतःचे कलात्मक आनंदमय असे मूल्य आहे. कलात्मक साहित्याचा गाभा विचारापेक्षा भावनाच अधिक असतो असेही साहित्यसमीक्षक सांगतात. ललित साहित्याच्या संदर्भात या वादाचा निकाल अजून झालेला नाही; परंतु एवढे मात्र निश्चित आहे की त्या त्या युगातील प्रभावी विचारांनी साहित्याचा आशय व साहित्याचा आकार (form) बदलला आहे. महान् आशयाला योग्य आकार प्राप्त झाला तर त्या साहित्याला किंवा त्या कलेला संस्कृतीतील अढळ स्थान प्राप्त होत असते म्हणून मी या ठिकाणी साहित्यिकांच्या या सभेपुढे साहित्याचा आशय किंवा त्याच्याशी संबद्ध असलेला विचार हा मुद्दा चर्चिला आहे. पाश्चात्यांची साहित्यसमीक्षाच आधुनिक सुशिक्षित भारताची साहित्यसमीक्षा बनली आहे. ही पाश्चात्यसमीक्षा आतापर्यंत भावनेच्या भोवताली फार घोटाळत होती. ती आता पुनः कलेच्या मुळाशी असलेला व कला निर्माण करणारा विचार कसा असतो, या संबंधी शोध करू लागली आहे. * मूर्तिनिष्ठ विचार (sculptural thinking), चित्रनिष्ठ विचार इत्यादि शब्दावली याचीच दर्शक आहे.

विचारमय किंवा ज्ञानमय रचनेचा निरपेक्ष (disinterested) आनंद मिळवून देणारे जे साहित्य तर्कसंगतीला प्राधान्य देणारे असते, त्यात निबंध, इतिहास, तत्त्वज्ञान, मानसशास्त्र व सृष्टिविज्ञान यांच्या ग्रंथांचा अंतर्भाव होतो. हे वैचारिक साहित्य होय. अशा साहित्यात सुद्धा ललित साहित्याइतका कलात्मक महिमा असलेले साहित्य असते. तर्कसंगति व कलात्मक संगति यांचा मिलाफ अशा साहित्यात झालेला असतो. महाभारतातलि विदुला-पुत्र संवाद, यक्षप्रश्न इत्यादि विचारप्रधान अध्याय कलात्मकतेचेही नमुने आहेत. भर्तृहरीचे शतकत्रय हा संस्कृत भाषेचा विचारप्रधान भाग असूनही तो कलात्मक शुभ व शोभात्मक अलंकार आहे. मराठीतील तत्त्वचिंतन-प्रधान ज्ञानदेवप्रणीत भावार्थदीपिका ही साहित्यकलेच्या उत्कर्षाची सीमा गाठते. इंग्लिशमध्ये गिबनचा इतिहास, स्पिनोझाचे नीतिशास्त्र, ब्रॅडलेचे तर्कशास्त्र यासारखे विचारप्रधान ग्रंथ कलात्मक दृष्टीनेही प्रशंसेस पात्र झाले आहेत.

मराठीतील वैचारिक साहित्याच्या निर्मितीचा वेग खूप मंद आहे. त्यामुळे कलात्मक आकार घेतलेले वैचारिक साहित्य अत्यंत अल्प प्रमाणातच निर्माण होत आहे. मराठीत ज्ञानब्रलाची उपासना मोठ्या प्रमाणात अजून होत नाही म्हणूनच मराठीचा विद्यापीठात प्रवेश होऊनही त्यातील उच्च विद्यासनावर इंग्रजीलाच कायम स्थान द्यावे लागत आहे. कारण ज्ञान हे सर्वात

* The British Journal of Aesthetics Vol. 2 No. 4



अनुक्रमणिका








अधिक महत्त्वाचे आहे. ते कोणत्या भाषेतून मिळवावयाचे ही गोष्ट त्यामानाने दुय्यम ठरते. भाषा हे विचाराचे वाहन आहे; अत्यंत मोलाचा विचार मराठी वाहनावरून आला की संस्कृत वाहनावरून आला, याबद्दल विचक्षण व जिज्ञासू माणूस चिंता करीत बसत नसतो. येथे हे मात्र ध्यानात ठेवले पाहिजे की मराठीचे महत्त्व मराठी जनतेच्या शिक्षणाच्या दृष्टीने अत्यंत आहे; कारण परकीय भाषेतर्फे शिक्षण घेण्याची शक्यता बहुसंख्यकांना नसते.

### उपसंहार

सध्या आपल्या सर्वांचे लक्ष हिमालयाकडे वेधलेले आहे. हिमालयाच्या पलीकडून आलेले राष्ट्रीय संकट हिमालयाच्या शिखरावर मजबूत ठाण मांडून बसले आहे. हे संकट केवळ राजकीय स्वरूपाचे नाही. हे युद्ध केवळ शस्त्रास्त्रांचे युद्ध नव्हे, वैचारिक आणि सांस्कृतिक मूल्यांचेही हे युद्ध आहे. राजकीय पराभवाच्या पोटी वैचारिक आणि सांस्कृतिक ध्येयवादाचाही पराभव समाविष्ट झाला आहे. राष्ट्राच्या जीवनमरणाचा हा झगडा आहे! ‘ मरण पतकरू परंतु निर्माल्य होऊन जगणार नाही ’ अशा तऱ्हेचा भारताच्या संरक्षण-मंत्र्यांनी जो निर्वाणीचा निश्चय प्रकट केला आहे, त्याचे वैचारिक विवरण करण्याचा येथे प्रयत्न केला आहे. विचारस्वातंत्र्य व संस्कृति यांचा संबंध साहित्य संमेलनाशी अत्यंत जिव्हाळ्याचा आहे; विचारस्वातंत्र्यातच साहित्याची संस्कृति जगते व विकास पावते म्हणून कम्युनिस्टचीनच्या आक्रमणाची पार्श्वभूमी ध्यानात धरून काही मूलगामी तत्त्वांची चर्चा येथे केली आहे.

गोमांतकात हिंदू व खिश्चन अशा दोन संस्कृतींचा संयोग झालेला आहे. दोन्ही संस्कृतींचे लोक येथे बंधुत्वाच्या नात्याने आनंदात नांदत आहेत. या दोन्ही तेजस्वी व पवित्र परंपरांच्या संगमाचे सुंदर दर्शन या ठिकाणी होत आहे. भारताच्या विशाल सामासिक ( composite ) संस्कृतींचा उत्कृष्ट नमुना येथे असून तो या गोमांतकाच्या निसर्गसुंदर भूमीची शोभा वाढवीत आहे. दुर्गा येथे शांतरूपाने प्रकट झाली आहे त्यामुळे ती विश्वशांतीचा थोर देवदूत जो खिस्त त्याच्या परमपावन क्रॉसचा मान राखीत आहे.

---

## लेखकांना विनंति

(१) ‘ नवभारत ’ मासिकासाठी पाठवावयाचे लेख कागदाच्या एकाच बाजूवर शाईने सुवाच्य लिहावे.

(२) लेखाची पोंच तावडतोब देण्यात येऊन त्यासंबंधी निकाल सामान्यतः एक महिन्यात कळविण्यात येईल. न स्वीकारलेला लेख परत करण्यासाठी अवश्य तो टपालखर्च पाठवावा.

(३) लेखाची मर्यादा सामान्यतः ४००० शब्दांहून अधिक नसावी. अनेक अंकातून लेखांक देण्यापेक्षा विशिष्ट मुद्यावर स्वतंत्र लेख लिहिणे बरे.

(४) आशयाला बाध न आणता लेखाची मर्यादा कमी करण्याचा अधिकार संपादकमंडळाला राहील.

(५) लेखाबद्दल अल्पस्वल्प मोबदला देण्याचे संपादकमंडळाने ठरविले आहे.

(६) अभिप्रायासाठी पाठवावयाच्या पुस्तकांच्या दोन प्रती येणे लवकर अभिप्राय देण्याचे दृष्टीने असे सोईचे पडते.

(७) लेख, संपादकासाठी इतर काही मजकूर व अभिप्रायासाठी पुस्तके कार्यकारी संपादकांचे पत्त्यावर मुंबईस पाठविणे.








श्री. व. भ. कर्णिक

# चीनचे आक्रमण आणि त्याचे स्वरूप

चीनबरोबर सध्या आपले जे युद्ध चालू आहे ते मोठे विचित्र स्वरूपाचे आहे. युद्धाची धुमश्चक्री महिन्याभरापूर्वी संपली आणि आज साऱ्या आघाड्यांवर सामसूम आहे. २० आक्टोबरपासून २० नोव्हेंबरपर्यंत चिनी फौजा एकामागून एक ठाणी काबीज करीत टोळधाडीसारख्या आपल्या प्रदेशात घुसल्या. आपल्या सैन्याचा पराभव करून आणि आपल्या दुबळेपणाचे जगापुढे प्रदर्शन मांडून २१ नोव्हेंबरला त्यानी युद्धविराम जाहीर केला आणि आता त्या आपल्या मुलुखात परत चालल्या आहेत. थोड्याच दिवसात निदान नेफा विभागातून त्या आपल्या हद्दीबाहेर जातील. मग पश्चिम भागातील लडाकमधील काही प्रदेश त्यांच्या ताब्यात राहील तेवढाच. पण तो प्रदेश आज पाच सात वर्षे त्यांच्या ताब्यात आहेच. तेव्हा त्याची विशेष क्षिती बाळगू नये असे चिनी सरकारचे म्हणणे आहे. म्हणून युद्ध संपले, आता आपण तडजोडीची बोलणी करू या असा त्यांचा भारत सरकारजवळ आग्रह आहे.

चीनची भूमिका स्पष्ट आहे. आपल्या सरकारची भूमिका मात्र असावी तशी स्पष्ट नाही. एकदा सांगितले जाते की आक्रमण करून व्यापलेला मुलुख मोकळा केल्याखेरीज बोलणी होणार नाहीत. त्यानंतर सांगितले गेले की सीमाविषयक वाटाघाटी होणार नाहीत, पण तेढ कशी कमी करता येईल याविषयी कोणचीही अट न घालता बोलणी करायला आमची तयारी आहे. आजची भूमिका आहे ती अशी की ८ सप्टेंबर १९६२ रोजी चिनी सैन्य ज्या ठिकाणी होते त्या ठिकाणी त्याने परत जावे, मग आम्ही वाटाघाटी करायला तयार होऊ. ८ सप्टेंबरची रेषा मानायची म्हणजे लडाकमधील जवळजवळ १४००० चौरस मैलांचा प्रदेश चिनी फौजेला ताब्यात ठेवू द्यायचा ही गोष्ट या ठिकाणी ध्यानात ठेवली पाहिजे. पण आपल्याला अपायकारक अशी ही ८ सप्टेंबरची रेषा मानायला चीन आज तयार नाही. उद्या तो तयार झाला, तर मात्र तडजोडीची बोलणी भारत सरकारला सुरू करावी लागतील. चीन आपल्या सरकारला लवकरच त्या पेचात टाकील अशी आज धास्ती निर्माण झाली आहे.

तडजोडीची बोलणी करणे सध्या चीनच्या फायद्याचे आहे. जितका प्रदेश गिळंकृत करणे शक्य होते, तितका तो अगोदरच वशात घालून बसला आहे. त्यानंतर सीमा प्रदेशाजवळील राज्यांना त्याने आपल्या शक्तीची चुणूक दाखवून ठेवली आहे. शिवाय विजयानंतरही आम्ही पराजितांशी बोलणी करायला तयार आहो असा लोकांच्या डोळ्यांत धूळ फेकील असा मोठा औदार्याचा आव त्याने आणला आहे. त्यामुळे बोलणी सुरू करण्यात चीनचे नुकसान नाही. झाला तर त्याचा फायदाच होईल. बोलण्यांचा घोळ घालून त्याला आपले सामर्थ्य वाढवता येईल. राजकीय डावपेच खेळून सरहद्दीच्या भागामध्ये नवे मित्र जोडता येतील आणि नव्या आणि जुन्या मित्रावर सामदामदंडभेदांचा प्रयोग करून त्याना अधिक अनुकूल बनवता येईल. एकीकडे बोलणी आणि दुसरीकडे स्वतःचा कार्यभाग साधण्यासाठी अशा तऱ्हेचे सारे प्रयत्न, हा तर कम्युनिस्टांचा वाटाघाटीचा नेहमीचा शिरस्ता आहे. तडजोडीची बोलणी हा एक युद्ध लढण्याचा वेगळा प्रकार आहे असे त्यांचे तत्त्वज्ञान त्यांना सांगते.

या उलट तडजोडीच्या बोलण्यामुळे भारताची फसगत होईल अशी फार धास्ती वाटते. एकतर, रणमैदानावर आपला पराभव झाल्यामुळे, आपली बाजू बरीचशी कमजोर झाली आहे आणि दुसरे म्हणजे तडजोडीतून काय साधायचे याविषयी आपल्याच मनात अद्याप खूप गोंधळ आहे. तसेच तडजोडीची बोलणी सुरू झाली, आता युद्धाची धास्ती उरली नाही असे समजून आपण कदाचित् पूर्वीसारखेच गाफील राहू. आणि मग, त्यांच्या दृष्टीने अनुकूल वेळ येताच, आक्रमण जेव्हा पुनरपि सुरू होईल त्यावेळी आताच्या खेपेसारखीच आपली त्रेधातारांबळ उडेल.

## चीनचे आक्रमण आणि त्याचे स्वरूप

आपल्या मनात गोंधळ आहे त्याचे खरे कारण म्हणजे असे आहे की चिनी आक्रमणाचे स्वरूप आणि अंतिम हेतु आपण अद्याप पुरे ध्यानात घेतलेले दिसत नाहीत. पुष्कळांना असे वाटते की वाद आहे तो केवळ सीमा रेषेपुरता, सीमा रेषा २ मैल इकडे असावी की ४ मैल तिकडे असावी एवढ्या पुरताच हा वाद आहे, त्यामुळे तडजोडीने हा वाद सहज सुटू शकेल अशी त्यांची अपेक्षा आहे. पंतप्रधान पं. नेहरू देखील सध्याच्या आक्रमणाचे सीमायुद्ध असे वर्णन करून या कल्पनेला मधूनमधून पुष्टी देतात. पण चीनच्या सीमा-विषयक मागण्यांकडे दृष्टी टाकली की कुणाच्याही हे ध्यानात येईल की हा सीमेबद्दलचा वाद नसून प्रदेश बळ-कावण्यासाठी चालवलेली ही धडपड आहे. सीमारेषेच्या गोष्टी बोलून चीनला भारताचा जवळजवळ ५०००० चौरस मैल एवढा मुलूख गिळंकृत करायचा आहे. चीनचा हा दावा अल्पांशाने जरी मान्य केला तरी ज्या हिमालयाने भारताचे सहस्रावधी वर्षे संरक्षण केले त्या हिमालयाचा आधारच तुटला अशी परिस्थिती निर्माण होईल. कारण हिमालयाच्या पर्वतराजीमुळे सरहद्द ठरते ही गोष्टच मुळी चीन मानायला तयार नाही. हिमालयाच्या पलीकडे येऊन नेफामधे ब्रह्म-पुत्रेच्या उत्तर तीरापर्यंतच्या मुलुखावर चीन आज अधिकार सांगतो आहे. पश्चिमेला त्यांना सबंध लडाक हवा आणि मध्य विभागातही हिमालयातील खिंडींच्या अलीकडील प्रदेशावर ते हक्क सांगतात. म्हणजेच वाद आहे तो सीमेबद्दलचा नसून बऱ्याच मोठ्या प्रदेशा-बद्दलचा आहे.

पण काही जणांचे म्हणणे असे की चीनची दृष्टी नेफावर नसून केवळ लडाकवर आहे. सिंकिआंग आणि पश्चिमी तिबेट यांच्यामध्ये सुरळीत दळणवळण चालू ठेवावयाचे म्हणजे अकसाई चीनच्या पठारावरून बांधलेला रस्ता फार महत्वाचा. हे दळणवळण निर्वेध-पणे चालू रहावे एवढीच चीनची इच्छा असून त्या साठी त्यांना लडाक हवा. नेफामध्ये त्यांनी आक्रमण केले ते केवळ लडाक मिळविण्याच्या हेतूने. म्हणून या विचारसरणीच्या मंडळींना असे वाटते की साध्या लष्करी हालचालींचा मोठे युद्ध म्हणून बागुलबुवा करू नये आणि वाद लडाकपुरताच मर्यादित आहे असे समजून वाटाघाटींनी तो सोडविण्याचा प्रयत्न करावा.

ही भूमिका खरी मानली तर २० ऑक्टोबर ते २० नोव्हेंबर या दरम्यान नेफामध्ये चिनी सैन्याने जे प्रचंड आक्रमण केले त्याची उपपत्ती लागत नाही. या आक्रमणामध्ये तीस एक हजार सैन्य प्रत्यक्षपणे गुंत-लेले होते. आणि त्याच्या मदतीसाठी तिबेटमध्ये जवळ जवळ एक लाख सैन्य उभे होते. ही सारी सैन्याची आणि युद्धसाहित्याची जमवाजमव वर्ष दोन वष चालू होती. लडाकबद्दलचा आपला हेतू साध्य करण्या-साठी चीनने नेफामध्ये एवढी यातायात करावी हे बुद्धीला पटत नाही. शिवाय लडाकबद्दलचे चीनचे उद्दिष्ट खरे मानायचे तर नेफाबद्दलचे त्यांनी अनेक वेळा जाहीर केलेले उद्दिष्ट खरे नव्हे असे का माना-यचे ? लडाकपेक्षा नेफा चीनला अधिक फायदेशीर आहे. नेफा मिळाला की सिकिम आणि भूतान आपो-आप चीनच्या पदरात पडतात आणि नेपाळला अंकित राष्ट्र म्हणून नांदणे प्राप्त होते. शिवाय ब्रह्मपुत्रेचे खोरे, आसाम आणि बंगाल यांच्या डोक्यावर टांगती तलवार उभी धरता येते. आक्रमणच करायचे तर ते केवळ निर्जन व निष्पर्ण अशा लडाकसाठीच करण्या-ऐवजी सहस्रपटीनी अधिक फायदेशीर अशा नेफा-साठीच करणे चीनला अधिक रास्त वाटेल. गेल्या दोन महिन्यातील घडामोडींकडे या दृष्टीने पाहणेच जास्त सयुक्तिक आहे.

पण मग चीनने युद्धविराम का केला आणि चिनी सैन्य मागे का परतू लागले आहे ? एकाच स्वारीत सगळी उद्दिष्टे साध्य करायची असे धोरण पुष्कळवेळा शत्रुपक्ष स्वीकारत नाही हे या बाबतीत ध्यानात ठेवा-यला हवे. मुसलमानांनी भारतावर अनेक वेळा स्वाऱ्या केल्या. सुरवातीच्या स्वाऱ्यांच्या वेळी लूटमार करून ते परत गेले. काही शतकांनंतर ते परत आले आणि मग भारतावर त्यांनी आपले राज्य स्थापन केले. चीन या इतिहासाची पुनरावृत्ति करणार नाही, असे कोण म्हणू शकेल ? या स्वारीच्या वेळी आपल्या सामर्थ्याची चुणूक दाखवावी, एवढाच कदाचित् चीनचा उद्देश असेल. आपण समर्थ आहोत आणि भारत निर्बल आहे याची प्रचीती पटली की हिमालयाच्या परिसरा-तील राज्ये आणि आशिया खंडातील लहानसहान राष्ट्रे विनासायास अनुकूल होतील आणि आपले नेतृत्व मान्य करतील अशी कदाचित् चीनच्या राष्ट्र-



अनुक्रमणिका

धुरीणांची कल्पना असेल आणि ती कल्पना खरी ठरली नाही असे आज तरी निदान हमखास म्हणता येत नाही. या तऱ्हेचें मर्यादित असे जे उद्दिष्ट होते ते सफल झाले म्हणून चिनी सैन्य परत गेले असे देखील म्हणता येईल. या खेरीज इतरही काही कारणे असू शकतील. तिबेटच्या पठारापासून बऱ्याच अंतरावर गेल्या कारणाने सैन्याला रसद व युद्धसाहित्य पोचविणे कठीण झाले असेल. रशियाने कदाचित् दडपण आणले असेल आणि इंग्लंड–अमेरिकेच्या मदतीनंतर लढाई जिंकणे सोपे जाणार नाही असेही बजावले असेल. आक्रमणानंतर भारतामध्ये बेदिली माजेल आणि गोंधळ उडेल, ही जी अपेक्षा होती ती खोटी ठरल्या-मुळे धोरणाचा फेरविचार करणे कदाचित् प्राप्त झाले असेल अशी एक ना दोन, पाच पंचवीस कारणेही असण्याची शक्यता आहे. युद्धविराम का झाला आणि सैन्य परत का चालले आहे, हे जरी आज निश्चितपणे सांगता आले नाही, तरी एक गोष्ट मात्र निश्चित आहे की गेलेले सैन्य परत येणार नाही आणि चिनी आक्रमणाचे संकट आता संपले अशी कल्पना करणे अत्यंत आत्मघातकीपणाचे ठरल्यावाचून राहणार नाही.

चीनच्या धोरणाविषयी त्या देशाच्या इतिहासावरून आपल्याला काही अंदाज बांधता येतात. इतिहासावरून असे दिसते की चीन हे एक विस्तारवादी असे राज्य-आहे. मध्यवर्ती सत्ता प्रबळ होती अशा प्रत्येक काल-खडात चीनने आपल्या साम्राज्याचा विस्तार वाढ-वण्याचे सतत प्रयत्न केलेले आहेत. एकेकाळी चीनने नेपाळ, भूतान, सिकिम, नेफा, ब्रह्मदेश, इंडोचायना, कोरिया इत्यादि अनेक राज्यांना आपले अंकित बन-विले होते. हे सारे देश आपल्याच साम्राज्याचे भाग आहेत असे आज देखील चीनला वाटते. हे सर्व आपले गमावलेले प्रदेश ( lost territories ) आहेत असे चीनच्या प्रत्येक राजकारणी पुरुषाला वाटते, आणि ते परत मिळविणे हे तो आपले राष्ट्रीय कर्तव्य समजतो. म्हणून चीन प्रबळ झाला की हे प्रदेश मिळविण्यासाठी आणि त्याच्याही पलीकडे हातपाय पसरण्यासाठी तो प्रयत्न केल्यावाचून राहणार नाही ही प्रत्येकाने मनाशी खूणगाठ बांधून ठेवावयास हवी. हल्लीचे भारतावरील आक्रमण ही त्या प्रयत्नाची नांदीच आहे असे म्हणा-वयास हरकत नाही.

चीन आज प्रबळ आहे एवढेच नव्हे तर तेथे आज कम्युनिस्टांचे अधिराज्य आहे. कम्युनिझम हे देखील एक विस्तारवादी आणि आक्रमणशील असे तत्त्वज्ञान आणि राजकारण आहे. चीनमध्ये त्याचा विस्तारवादी अशा राष्ट्रवादाशी संयोग झाला आहे. “ आधीच मर्कट तशातहि मद्य प्याला ” म्हणजे जी अवस्था होते ती आज कम्युनिस्ट चीनची झाली आहे असे म्हणण्यास हरकत नाही. कम्यु-निस्ट चीनला सबंध आशिया खंडावर आपले अधिराज्य स्थापन करायचे आहे. आफ्रिकेवरतीही त्याची दृष्टी आहे. आणि तिथेही त्याचे प्रयत्न चालू आहेत. आणि आज ना उद्या जगावर स्वामित्व गाजवण्याचीही मनीषा त्याच्या ठिकाणी उद्भवणार नाही म्हणून कुणी सांगावे ? कारण चीनचा राष्ट्रपुरुष असा जो कनफ्युशिअस त्याने कधीच सांगून टाकले आहे की “ आकाशात दोन सूर्य कधीच नसतात ” ( There are no two suns in the sky ). याच गोष्टीची कदाचित् कम्युनिस्ट रशियाला धास्ती वाटत असावी, आणि त्यामुळेच कदाचित् त्या दोन कम्युनिस्ट राष्ट्रांमधील तेढ वाढत चालली असावी. पण आजच त्या तेढीचा भारताला किंवा आशियातील इतर राष्ट्रांना खूप फायदा मिळेल अशी आशा बाळगण्यात हशील नाही. चीन सध्या जो हातपाय पसरतो आहे तो आशिया खंडांत. त्याचा रशियाला विशेष उपद्रव होणार नाही. म्हणून आशियातील चीनच्या या विस्तारवादी प्रयत्नांकडे रशिया दुर्लक्ष करील हेच अधिक सयुक्तिक वाटते.

चीनला भारताचे वैषम्य वाटते ते लोकशाहीच्या मार्गाने समाजाची आर्थिक, सामाजिक आणि राजकीय पुनर्घटना करण्याचे जे प्रयत्न चालू आहेत त्यामुळे. भारतातील हा प्रयोग यशस्वी ठरला तर आशियातील राष्ट्रांना कम्युनिझम आकर्षक वाटणार नाही. त्यांचे लक्ष चीनपेक्षा भारताकडेच अधिक लागून राहील. आणि मग आशिया खंडावर स्वामित्व प्रस्थापित करण्याच्या आपल्या मनीषेवर पाणी सोडावे लागेल अशी चीनच्या कम्युनिस्ट पुढाऱ्यांना धास्ती वाटते. कम्युनिझममुळेच जगाचा आणि विशेषतः आशिया-तील पददलीत राष्ट्रांचा उद्धार होऊ शकेल या त्यांच्या सिद्धांतालाही त्यामुळे धोका पोचतो. आणि भारतात










लोकशाहीचा प्रयोग यशस्वी झाला तर चीनमधील आपली हुकूमशाही फार काळ टिकणार नाही ही भीती देखील त्यांना वाटत असावी. त्यामुळे लोकशाहीच्या मार्गाने हलके हलके प्रगतीची पाऊले टाकणारा भारत त्यांच्या डोळ्यात खड्यासारखा सलू लागला आहे. आपली ही प्रगती थांबविणे हा देखील चिनी आक्रमणाचा हेतु असेल. म्हणूनच चीनशी आपले जे युद्ध सुरू झाले आहे ते सीमा प्रश्नापुरते किंवा सीमाप्रदेशापुरते मर्यादित नसून, त्याचे स्वरूप फार व्यापक आहे. दोन जीवनपद्धतींमधील, जीवनाच्या दोन तत्वज्ञानांमधील तो संघर्ष आहे. लोकशाही विरुद्ध हुकूमशाही असे त्या संघर्षाचे वैचारिक स्वरूप आहे.

१९५० साली स्वतंत्र तिबेटचे दान कम्युनिस्ट चीनच्या पदरात टाकले नसते तर चीनला सीमाप्रदेशाबद्दलचा वाद घालण्याची आणि वाढवण्याची संधीच सापडली नसती. उत्तरेकडील दोन टोके सोडली तर आपल्या सर्व सीमा भिडल्या आहेत त्या तिबेटशी. तिबेट स्वतंत्र होते तोवर चिनी सैन्य हिमालयापाशी पोचू शकत नव्हते. तिबेटच्या स्वातंत्र्यहरणानंतर चिनी फौजांचा हिमालयापर्यंत अनिर्बंध संचार सुरू झाला. तिबेटच्या पठारावर सैन्याची आणि साधनसामुग्रीची जुळवाजुळव करून नंतर त्यांना स्वतःच्या सोईप्रमाणे भारतावर हल्ला करता आला. तिबेटच्या पठारांचा जोवर चीनच्या सैन्याला उपयोग करता येईल तोवर हिमालयाच्या या बाजूला त्याचा प्रतिकार करणे आपल्याला फार कठीण जाणार आहे. म्हणून त्या पठारांचा चीनला उपयोग करता येणार नाही अशी तजवीज आपल्याला आज ना उद्या करावी लागणार आहे. म्हणजेच तिबेटवरील प्रेमामुळे नव्हे तर स्वसंरक्षणाच्या दृष्टीने देखील त्या देशाचे हिरावलेले स्वातंत्र्य त्याला परत मिळवून देण्याची खटपट आपल्याला करावी लागेल. तिबेटच्या स्वातंत्र्याची मागणी आपल्या नेत्यांना "अतिशय चमत्कारिक" ("fantastic") वाटते. पण उद्या चीनच्या आक्रमणाने उग्र स्वरूप धारण केले की तिबेटच्या भूमीवरून चिनी सैन्याची हकालपट्टी केल्याखेरीज आपल्या सीमाप्रदेशात शांतता नांदणार नाही हे त्यांना कळून आल्याखेरीज राहणार नाही.

आज युद्धविराम झाला आहे हे खरे. पण तो पूर्णविराम नव्हे. रणांगणावरील युद्ध थांबवून, काही दिवस चीन खलबतखान्यामध्ये युद्ध लढणार आहे. पण खलबते करून, बोलणीचालणी करून, आपला कार्यभाग साधत नाही असे दृष्टीस पडताच चीन पुन्हा रणांगणाकडे वळणार आहे. वाटाघाटींनी त्यांचा कार्यभाग साधणे शक्य नाही, कारण त्यांची भूक फार मोठी आहे. लडाक, नेफा वगैरे सीमाप्रदेश तर त्यांना हवेच आहेत. पण अंतिमतः त्यांना भारतामध्ये स्वतःला अनुकूल असे कम्युनिस्टांचे असो किंवा कम्युनिस्ट-सहकाऱ्यांचे असो-राज्य स्थापन करावयाचे आहे. म्हणून लढा अटळ आहे आणि त्याची तयारी करणे हेच आपले कर्तव्य आहे.

---







अनुक्रमणिका

प्रा. न. र. फाटक

# कै. दत्तात्रय बाळकृष्ण डिस्कळकर



महाराष्ट्रांतील एक गाढे इतिहाससंशोधक व पुरातत्त्वज्ञ श्री. द. बा. डिस्कळकर हे ता. २ नोव्हेंबर १९६२ रोजी मध्यरात्रीनंतर मुंबईस वांद्रे येथे आपल्या ज्येष्ठ चिरंजीवाच्या बिऱ्हाडी अकस्मात् हृदयविकाराने दिवंगत झाले. आक्टोबर महिन्याच्या मध्यात पुणे विद्यापीठाची कै. न. चिं. केळकर व्याख्यानमाला गुंफण्याकरिता एक आठवडा तेथे घालवून मुंबईस परत आल्यावर ह्या व्याख्यानांच्या हस्तलिखितामध्ये सुधारणा करण्याचे काम त्यांनी चालविले होते. आक्टोबराचा शेवटचा आठवडा नेहमीप्रमाणे बिनतक्रार पार पडला. ता. १ नोव्हेंबर रोजी छातीत दुखू लागले. सामान्य औषधोपचारांनी ती पीडा किंचित् थांबली; पण जागा बदलून त्या पीडेने आपला प्रभाव चालू ठेवला अर्थात अस्वस्थता कायम होती. त्या अस्वस्थतेतच त्यांचे प्राणोत्क्रमण घडले. गेल्या दोन तीन वर्षांत मागच्या पिढीतील महाराष्ट्राचे जे नामवंत इतिहासपंडित गमावले त्यांत डिस्कळकरांच्या मृत्यूने भर पडली आहे.

कै. डिस्कळकरांचा जन्म १८९२ साली साताऱ्यास झाला. त्यांच्या वडिलांची सांपत्तिक स्थिती गरिबीची होती. तिच्याशी धैर्याने झगडत त्यांनी आपला प्रपंच चालविला होता. सांपत्तिक दैन्याची झळ सोशीत साताऱ्यास डिस्कळकरांनी मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण रेटले व नंतर इंदूर, बनारस याप्रमाणे स्थलान्तर करीत त्यांनी एम. ए. ची पदवी पदरात पाडून घेतली. संस्कृत व भारताचा प्राचीन इतिहास या दोन विषयांची आवड त्यांच्या ठिकाणी स्वभावतःच असल्यामुळे पुढे त्यांनी इतिहाससंशोधनाचा मरेपर्यंत अखंड व्यासंग चालविला होता. परंतु स्थिरत्व असे त्यांच्या वास्व्यास अलीकडील दहा वर्षे सोडल्यास कधीच आले नाही. एम्. ए. झाल्यानंतरची काही वर्षे त्यानी गुजरात–सौराष्ट्रात घालविली. काही वर्षे मथुरेच्या सरकारी ऐतिहासिक वस्तुसंग्रहालयाचे क्युरेटर या नात्याने सरकारी नोकरीत सारली. काही काळ साताऱ्याच्या पारसनीस म्यूझिअमचे क्युरेटर म्हणून काम केले, पुण्याच्या पेशवेदप्तरात डिस्कळकर काही काळ वावरले. पुढे इंदुरास सगळ्या प्रपंचासह जाण्याची पाळी ओढवली. त्यांचे इंदूरचे या वेळचे वास्तव्य एकप्रकारे आर्थिक दैन्याशी झगडण्याच्या कसोटीचे होते. मुले लहान, बायको दुखण्याने अंथरुणास खिळलेली, इंदुरास मिळालेल्या नोकरीचा पगार डिस्कळकरांची योग्यता आणि प्रापंचिक जबाबदारी याकडे पाहता अगदीच क्षुद्र. अशा विलक्षण ओढाताणीत ते धीराने दिवस कंठीत होते. इंदूरास डिस्कळकर तेथील म्यूझिअमचे क्युरेटर म्हणून होते. या कामाचा पगार किती तर रु. ५०. परंतु काहीच मिळकत नसण्यापेक्षा रु. ५० देखील पुष्कळच, अशा समाधानाने इंदुरास रहात असता तेथे मेथा आडनांवाचे एक प्रसिद्ध कलारसिक सिव्हिल सर्व्हंट दिवाण होऊन आले. कलेचा त्यांना छंद होता. इंदूरच्या म्यूझिअमला कलेच्या ओढीने एकदा त्यांनी भेट दिली. म्यूझिअम दाखविण्याचे काम क्युरेटरचे. त्याचे नांव दिवाणसाहेबानी विचारले. डिस्कळकर हे नांव ऐकताच त्यानी गुजरात–सौराष्ट्रातील अनेक शिलालेखांना उजेडात आणणारे डिस्कळकर तुम्हीच कां असा मेथांनी प्रश्न केला व तेच हे डिस्कळकर असे समजताच दिवाण-







साहेबाना संस्थानामार्फत क्युरेटरला दिल्या जाणाऱ्या पगाराबद्दल चीड येऊन त्यांनी डिस्कळकरांच्या पगारात बऱ्याच मोठ्या रकमेची वाढ केली डिस्कळकरांची आर्थिक स्थिती थोडीशी सुधारली. हे मेथा पुढे डिस्कळकरांचा परामर्श करीत राहिले. गुजरातच्या लेखकांत डिस्कळकरांचा समावेश असलेला एक ग्रंथ आहे.

डिस्कळकर साताऱ्यास पारसनीस म्यूझिअमचे क्युरेटर असता त्या म्यूझिअमच्या व्यवस्थामंडळात एक महाराष्ट्रीय इतिहासज्ञ होते. त्यांचे व डिस्कळकरांचे कामासंबंधात जमेना. वस्तुतः इतिहासज्ञतेसंबंधात डिस्कळकरांची व त्या व्यवस्थामंडळसदस्याची तुलना करता येणार नाही. एकजण ज्ञानाने वरचढ व खंबीर तर दुसरा सामान्य ख्यातीने व पारसनीस म्यूझिअमपुरता अधिकाराने मोठा. या अधिकाराने त्याच्या अहंकारालाही धार चढली होती. डिस्कळकर आपले ऐकत नाहीत तेव्हा त्यांना नोकरीवरून हाकलण्यासाठी युक्त्या शोधीत असता त्याने डिस्कळकरांविषयी ते हीन चारित्र्याचे असा गवगवा आरंभून डिस्कळकरांना नोकरीवरून काढले. पारसनीस म्यूझिअमसाठी डिस्कळकरांना क्युरेटरच्या जागेचे आमिष दाखवून पूर्वीची नोकरी सोडायला लावणाऱ्या सदर गृहस्थाने त्यांस साताऱ्याच्या नोकरीतून हाकलताना या मागील गोष्टीचे स्मरण बाळगले नाही, हे ध्यानात ठेवणे बरे. तो काळ कांग्रेसपक्षाच्या पहिल्या स्वराज्यकर्तृत्वाचा होता. मुख्य राज्यसूत्रधार व राज्यकारभारातील सर्व माणसे शंभर टक्के शुद्ध चारित्र्याची पाहिजेत, अशी खुळी समजूत उराशी बाळगणारे तेव्हाचे मुख्य मंत्री होते. डिस्कळकराविरुद्ध चारित्र्यहीनतेची वावटळ त्या मुख्यमंत्र्याला वावगी वाटली नाही. डिस्कळकर नोकरीस आंचवले व सरकारात त्यांची दाद लागण्याचीही शक्यता उरली नाही. ज्याने डिस्कळकरांना आर्थिक दृष्ट्या दुर्धर स्थितीत लोटले त्याच्या निमंत्रणाला डिस्कळकर भाळले याचे कारण डिस्कळकर मूळचे साताऱ्याचे, त्या ठिकाणी रहायला मिळेल व आपले इतिहाससंशोधनाचे आवडते कामही करता येईल असा दुहेरी लाभाचा लोभ. डिस्कळकरांविषयी लिहिताना साताऱ्याच्या नोकरीची माहिती मानवीस्वभावाचे वैचित्र्य ध्यानात येण्याकरिता थोडी विस्ताराने दिलेली आहे. डिस्कळकरांचे नशीब जन्मतः साताऱ्याच्या म्यूझिअमशी जखडलेले नव्हते. इतिहाससंशोधनाच्या भरीव कामगिरीने जसे त्यांना साताऱ्यास नेले तसेच त्या कामगिरीच्या कीर्तीने त्यांना इंदुरास तारले. स्वकीयांहून पुष्कळदा परस्थांना एखाद्याच्या विद्वत्तेची पारख जास्त बिनचूक असते, अशी ज्ञानाच्या क्षेत्रात पुष्कळ उदाहरणे आढळतात.

महाराष्ट्रात डिस्कळकर काहीसे मागे पडल्याप्रमाणे वाटतात. हल्लीचे युग खटपटीलटपटीचे, धक्काबुक्कीने इतरांना मागे सारीत पुढे येण्याचे आहे. डिस्कळकरांची प्रकृति अशा तऱ्हेच्या अहंविशेषवृत्तीला अनुकूल नव्हती. त्यांनी मुंबई-पुण्याच्या विद्यापीठातील काही व्याख्यानमाला ओवल्या. प्राचीन भारतीय इतिहासाच्या विषयाचे ते बहुधा दरवर्षी परीक्षक नेमले जात असत. अनेक प्राच्यविद्यासंशोधनाच्या संस्थांशी त्यांचा संबंध होता; पण महाराष्ट्रात कोण कोण विद्वान् आहेत अशी चर्चा निघाल्यास डिस्कळकरांचे नांव हटकून आठवावे असे विद्वज्जनातील अग्रगण्यत्व त्यांना मिळविता आले नाही. शिलालेखांच्या अभ्यासात व जाणतेपणात डिस्कळकरांचा हात धरील असे विद्वान भारतात विरळाच सांपडतील अशा अर्थाची प्रशस्तिपत्रे त्यांना लाभल्याची उदाहरणे आहेत. त्यांनी इतिहासविषयावर लिहिलेले विद्वन्मान्य लेख शेकड्यांनी मोजावे लागतात. त्यांच्या बुद्धीतील मूलग्राहित्वाचा गुण एका उदाहरणाने सिद्ध होऊ शकतो. प्राचीन शिलालेखांचे संशोधन आणि वाचन गेली शंभरसवाशे वर्षे सारखे चालू आहे. पण शिलालेखांसाठी कोणत्या पदार्थांचा उपयोग केला जात असे, या प्रश्नाकडे प्रथम लक्ष डिस्कळरांनी पुरविले व संशोधनपूर्वक एक प्रबंध लिहून काढला. ( शिलालेख हा शब्द येथे अतिशय स्थूल अर्थाने वापरला आहे. अशा लेखाकरिता शुद्ध दगडाचीच निवड होत नव्हती, म्हणून डिस्कळकरांना त्याबद्दल लिहिणे शक्य झाले ) त्यांच्या प्रबंधाची तज्ज्ञांनी वाहवा केली.

शिलालेखातील कवित्व हा विषय हाती घेऊन सुमारे ८०० कवींची माहिती त्यांनी गोळा केली होती शिलालेख, लोहस्तंभावरील प्रशस्तिपर काव्ये वगैरे साहित्यात काव्यगुण असल्याची वाच्यता बुल्हर यानी कित्येक वर्षामागे केली होती. त्या वाच्यतेची यथार्थता

सविस्तर पटविण्याकरिता डिस्कळकरांनी उद्योग आरंभला. तो उद्योग पुरेसा झाला तेव्हा त्याच्या प्रकाशनाकरिता त्यानी असल्या कामाचे कंकण हाती बांधलेल्या दिल्लीतील एका प्रख्यात निमसरकारी संस्थेकडे तो पाठविला. त्या संस्थेने डिस्कळकरांच्या कामाची परीक्षा करण्यासाठी त्याची रवानगी अधिकारारूढत्वाने तज्ज्ञ समजल्या जाणाऱ्या एका व्यक्तीकडे केली. या परीक्षकाने संस्थेस कळविले की डिस्कळकरांच्या कामासारखे काम आपण करीत आहो, म्हणून डिस्कळकरांच्या पुस्तकाला साह्य देणे योग्य होणार नाही. बड्या अधिकाऱ्याच्या अभिप्रायाला डावलणे अनुचित समजून सदरसंस्थेने डिस्कळकरांच्या तोंडास पाने पुसली. डिस्कळकराचा ग्रंथ मोठा, त्याचा खप साहजिकच कमी होणार, तेव्हा तो प्रकाशित करण्याला एखादा धनाढ्यच प्रकाशक हवा. अर्थात तो ग्रंथ हस्तलिखिताच्या रूपाने त्याच्या कागदपत्रामध्ये धूळ खात पडेल असा संभव अधिक आहे. हे सुद्धा येथे सांगून ठेवणे अवश्य आहे की ज्याने डिस्कळकरांच्या हस्तलिखिताला आश्रय न देण्याचा सल्ला दिला, त्यानेहि चारपांच वर्षे लोटली तरी आपले काम हातावेगळे केलेले नाही; किंबहुना शिलावाङ्मयांतील काव्यगुणांची ओळख करून देण्याचे काम त्याने हाती घेतले आहे की नाही, अशी शंका घेतल्यास चूक होणार नाही. तूर्त त्या अधिकाऱ्याने डिस्कळकरांच्या कामाला खो दिला एवढेच तात्पर्य स्वीकारावे लागते.

डिस्कळकरांचे निरंतर अध्ययन हेच काय ते एक व्यसन होते. गेल्या दहा वर्षात त्यांचे मुलगे शिकून कमाई करू लागल्याने पूर्वीची ओढाताण थांबली होती. यामुळे डिस्कळकर निश्चिंतपणे आपला काळ व्यासंगांत घालवीत असत. मुंबईस असले की, दुपारचे भोजन आटपून त्यांची स्वारी विद्यापीठाच्या ग्रंथसंग्रहालयात येऊन बसायची व दिवस मावळेपर्यंत वाचन, टिपणांचे लेखन, त्यावर चिंतन मनन करावयाची असा त्यांचा नियम होता. अशा रीतीने त्यांनी महाराष्ट्र व गुजरात–सौराष्ट्र या प्रदेशांचा सर्वांगीण इतिहास आत्मसात करून ठेवला होता. पुणे विद्यापीठाच्या न. चिं. केळकर व्याख्यानमालेची जाहिरात पहाण्यात आल्यावर महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासावर आपण बोलावे असे त्यांच्या मनात येऊन त्यांनी त्याप्रमाणे अर्ज पाठविला. अर्जासोबत व्याख्यान विषयाची रूपरेषा रवाना केली. सुदैवाने त्यांचा अर्ज निवडमंडळाच्या पसंतीस उतरला व त्यांची पुण्यास व्याख्याने झाली. यानंतर गुजरात–सौराष्ट्राच्या प्राचीन इतिहासावर त्यांची मुंबई विद्यापीठाच्या विद्यमाने व्याख्याने व्हावयाची होती. पुण्याच्या व्याख्यानानंतर एका आठवड्याने ते कालवश झाल्यामुळे यापुढे डिस्कळकरसंबंधात कसलाच विचार करण्याला अवकाश राहिलेला नाही. ही व्याख्याने त्यांनी लिहून काढली होती म्हणून पुस्तकरूपाने ती पुणे विद्यापीठाच्या द्वारे जनतेच्या हाती पडण्याची आशा आहे. यापैकी एका व्याख्यानांत ते मृच्छकटिक नाटकाचा कर्ता शूद्रक हा महाराष्ट्रीय असल्याचे सिद्ध करणार होते. व्याख्यानांचा ग्रंथ समोर आल्याशिवाय शूद्रकाचे महाराष्ट्रीयत्व पटविण्याकरिता डिस्कळकरांनी कोणते पुरावे सादर केले आहेत, याचा जिज्ञासूंना बोधहोणार नाही.

डिस्कळकर स्वभावाने संकोची वृत्तीचे होते. बाळपणापासून दारिद्र्याशी झगडा, नंतर पुनः पुनः होणारी निर्वाहाच्या उद्योगातील पीच्छेहाट, अशा संकटांना टक्कर देणाऱ्या पुरुषात आडदांडपणा, अरेरावी, वगैरे स्वभावविशेषांचा जोर वाढतो किंवा घासाघिशीचा प्रसंग टाळणारा संकोच बळावतो. डिस्कळकरांच्या स्वभावात संकोचाचा पगडा बसला. त्यांना ज्या विषयांचे ज्ञान होते त्या विषयांची एखाद्या ठिकाणी चर्चा चालू असून तिच्यात क्वचित् चूक होत आहे, असे ध्यानात आले तरी ती चर्चा ऐकून गप्प राहाण्याइतका ह्यांच्या ठिकाणी गाढ मनःसंकोच वसत असल्याचे प्रसंग त्यांच्या परिचितांना पुष्कळ सांगता येतील. डिस्कळकरांची शरीरयष्टिदेखील एकदम डोळ्यात भरण्यासारखी नव्हती. अशा कित्येक कारणांनी डिस्कळकर विद्वत्तेच्या चढाओढीत मागे राहिले पण त्यांच्या संशोधनकार्याचा पसारा फार मोठा आहे. व त्यायोगाने त्यांना ज्ञानोपासनेच्या क्षेत्रात मान मिळत होता. डिस्कळकरांचा विशेष म्हणजे त्यांनी संकटकाळातही ज्ञानार्जनाकडे पाठ फिरविली नाही. डिस्कळकरांच्या निधनाने इतिहासाचा एक निष्ठावान सेवक गेला ही मोठी हानि समजावी लागते.








**श्री. म. द. नवरे**

# केनियांतील पंधरा वर्षे

हिंदुस्थान स्वतंत्र होण्याचे सुमारास व्यवसायाचे निमित्ताने मी पूर्व आफ्रिकेतील केनिया या ब्रिटिश वसाहतीत गेलो आणि आतापर्यंत मी तेथेच वास्तव्य केले. या अवधीत तेथील जीवनाशी मला समरस होता आले. समाजाच्या निरनिराळ्या थरात मिसळण्याची व अनेक सार्वजनिक संस्थांतून जबाबदारीने काम करण्याची संधी मिळाली. दुसऱ्या महायुद्धानंतरच्या जागतिक जागृतीचा एक भाग म्हणून सर्व जगात मागासलेला म्हणून समजण्यात आलेल्या आफ्रिका खंडातही अपूर्व जागृती होऊन परकीयांची सत्ता झुगारून देऊन एकामागून एक देश आत्मसाक्षात्काराने स्वतंत्र होत चालले. या लाटेचा वेग अद्यापि कमी झालेला नाही.

या दीर्घ अवधीत पूर्व आफ्रिकेतील एका भागातील सामाजिक आणि राजकीय स्थित्यंतरे मला प्रत्यक्ष पहावयास आणि अनुभवावयास मिळाली. त्यांचे अल्पसे चित्र रेखाटण्याचा मी येथे प्रयत्न केलेला आहे. हे चित्र न्याहाळून पहात असताना त्यात आपण निकटच्या भूतकाळातील हिंदुस्थानचे चित्रही पहात आहोत की काय, असा वाचकांना भास होण्याची शक्यता आहे. कारण अगदी स्थूलमानाने का होईना, सारख्या परिस्थितीत सारखी चित्रे दिसणे स्वाभाविक आहे. माझ्या विवेचनात मी मुख्यतः ताज्या म्हणजे गेल्या पांच वर्षांतील घडामोडींचा धावता परिचय करून दिलेला असला तरी त्यात पूर्वीच्या कालातील पार्श्वभूमीही प्रतिबिंबित झालेली आहे.

गेल्या पाच वर्षांत सबंध आफ्रिका खंडात एवढी जागृती झाली आहे की इतरत्र इतिहासात त्याला तोड सापडणे कठीण जाईल. अत्यंत मागासलेला व बाहेरच्या लोकांना अज्ञात असलेला हा मोठा भूप्रदेश युरोपियन साम्राज्यवादी राष्ट्रांनी आपल्या अंमलाखाली गेल्या शतकात आणला. गेल्या शंभर वर्षांत आफ्रिकन लोकांना पाश्चात्य संस्कृतीची व चालीरीतींची माहिती झाली. गेल्या चार पाच वर्षांत इंग्लंड, फ्रान्स बेलजियम या राष्ट्रांनी आपल्या अंमलाखालील बऱ्याच आफ्रिकन देशांना स्वातंत्र्य दिले आहे व थोडे राहिलेले देश लवकरच स्वतंत्र होतील अशी चिन्हे दिसत आहेत.

पूर्व आफ्रिकेतील ब्रिटिश अंमलाखालील चार प्रदेश म्हणजे केनिया, युगँडा, टँगनिका आणि झांझिबार. या पैकी गेल्या वर्षी टँगनिका व दोन महिन्यापूर्वी युगँडा स्वतंत्र झाले. केनिया व झांझिबार एक वर्षाने पूर्ण स्वतंत्र होतील असा अंदाज आहे.

## युरोपियन आणि हिंदी

गेल्या पंधरा वर्षांत केनियामध्ये जी राजकीय, सामाजिक व शैक्षणिक स्थित्यंतरे झाली ती कोणालाही आश्चर्यकारकच वाटतील. पंधरा वर्षांपूर्वी सर्व क्षेत्रातून युरोपियन लोकांचे प्राबल्य दिसत होते. देशाच्या कायदेमंडळातून त्यांचे बहुमत होते. थोडेसे एशियन (हिंदु, मुसलमान, व अरब) सभासद असत. पण निवडून गेलेला असा एकही आफ्रिकन प्रतिनिधी नसे. सरकारी नोकरीतून मोठ्या हुद्याच्या जागा युरोपियनांच्यासाठी राखून ठेवलेल्या असत. सरकारी नोकरीत पगाराचे प्रमाण युरोपियन, एशियन, व आफ्रिकन, यांचे निरनिराळे असे. राहण्याच्या व खेळण्याच्या जागा, शाळा व हॉटेले युरोपियनांच्यासाठी राखीव असत. देशातील अत्यंत सुपीक भाग (white Highlands) युरोपियनांनी स्वतःसाठी ठेवलेला होता.

या काळात युरोपियनांच्या इतका सरकारी पाठिंबा नसताही हिंदी लोकांना आपली आर्थिक उन्नति करून घेण्याची संधी मिळाली. व्यापारात व उद्योगधंद्यांतून हिंदी लोकांनी स्वतःच्या कौशल्याने यश कमावले. प्रमुख शहरांतून जी घरे दिसतात ती बहुतेक हिंदी लोकांच्या मालकीची आहेत. सरकारी नोकरीतही बऱ्याच हिंदी लोकांचा शिरकाव होऊ शकला. मिळकतीचे प्रमाण चांगले असल्यामुळे बऱ्याचशा आधुनिक सुखसोयी हिंदी लोकांना मिळू शकल्या. आज बऱ्याच हिंदी लोकांजवळ मोटारी, रेफरीजरेटर्स, रेडियो वगैरे आधुनिक सुखसोयींची साधने आहेत.

## बदलत्या काळाची पावले

परंतु गेल्या दोन तीन वर्षांत झालेल्या घडामोडीवरून युरोपियन व एशियन लोकांना अनुकूल असलेली ही परिस्थिति पुढे चालू राहील असे वाटत नाही. केनियासाठी लंडनमध्ये १९६० सालच्या प्रारंभी व








१९६२ साली दोन घटना परिषदा झाल्या. केनियाला स्वातंत्र्य देण्याचे ब्रिटिश सरकारचे धोरण व त्याकरिता देशात होणाऱ्या घडामोडी याचे आफ्रिकन लोकांना चांगले आकलन होत आहे व त्यामुळे भविष्यकाळ भूतकाळापेक्षा अनेक दृष्टींनी भिन्न असणार याबद्दल त्याना संशय राहिलेला नाही. कायदेमंडळात आता आफ्रिकन सभासदांचे पूर्ण बहुमत आहे. युरोपियन व एशियन लोकासाठी मुळीच जागा राखून ठेवलेल्या नाहीत; सरकारी नोकरीतून आफ्रिकन लोकांना शक्यतोवर संधी देण्याचे सरकारी धोरण अंमलात आणण्यास सुरवात झाली आहे. शाळा व हॉटेले आता विशिष्ट जमातीसाठी राखून ठेवली जाणार नाहीत. युरोपियन मालकीच्या शेतीच्या जमिनी आता कोणालाही विकत घेता येतात, एवढेच नव्हे तर आफ्रिकन लोकांनी या जमिनी विकत घ्याव्यात म्हणून त्यांना आर्थिक मदत करण्याचे सरकारचे धोरण जाहीर झालेले आहे ! व्यापारामध्ये पुढे येण्यास जरूर ती मदत आफ्रिकन लोकांना सरकारकडून मिळते. शिक्षणातही त्यांची प्रगती झपाट्याने होत आहे. आफ्रिकन पुढाऱ्यांनी निरनिराळ्या क्षेत्रात पुष्कळ आफ्रिकन तज्ज्ञ लवकर तयार व्हावेत म्हणून इंग्लंड-अमेरिकेतून त्यांच्या शिक्षणाची सोय केली आहे. पूर्व आफ्रिकेचे एक विद्यापीठही लवकरच स्थापन होणार आहे.

### परकीयांचे दिवस संपले

आफ्रिकन लोकातील या जागृतीचा परिणाम हिंदी लोकांच्या जीवनावर साहजिक होणारच. आतापर्यंत व्यापारासाठी हिंदी लोक या देशाच्या अगदी दूरदूरच्या ठिकाणी जाऊन स्थायिक होऊन राहिले होते. तेथे आफ्रिकन वस्तीत राहून त्यांनी आपला चांगला जम बसविला होता. पण आता बदललेल्या युगात पुष्कळ लोकांना असे राहाणे कठीण होऊ लागले आहे. आत्तापर्यंत एकंदर आफ्रिकन समाज अशिक्षित व मागासलेला होता. त्याला पुढे येण्यासाठी संधी मिळत नसे. नोकर म्हणून कष्टाची कामे करून थोड्याशा वेतनातून ते लोक आपला उदरनिर्वाह करीत. राहावयाची त्यांची घरे सुद्धा अगदी साधी मातीची बांधलेली व गलिच्छ वस्तीत असत. तेव्हा एकंदर आफ्रिकन समाजाला आपल्या देशात आपण गरीब व बाहेरून येथे आलेले युरोपियन व हिंदी हे श्रीमंत याबद्दल वैषम्य वाटत असल्यास काहीच आश्चर्य नाही. आता आफ्रिकन लोकांच्या वेतनात व राहाणीत खूपच फरक होत आहे. आफ्रिकन लोकांचा मध्यमवर्गही हळूहळू तयार होत आहे. चांगल्या पगाराच्या व हुद्याच्या जागांवर आफ्रिकन लोकांच्या नेमणुका होत आहेत व चांगल्या आधुनिक घरातून व बंगल्यातून राहाण्याची त्याना संधी मिळत आहे. नैरोबी व मोंबासा या प्रमुख शहरातील मेयर सध्या आफ्रिकन आहेत.

### जमातीजमातीतील वैषम्य

आपल्या अंमलाखालील देशांना केव्हा व कसे स्वातंत्र्य द्यावे हे ब्रिटिश लोकाना चांगले कळते. स्वातंत्र्यानंतर देशात शांतता नांदावी व लोकांनी जबाबदारीने राज्यकारभार चालवावा याबद्दल ब्रिटिश सरकार शक्यतो काळजी घेते. त्यामुळे ब्रिटिशांनी स्वातंत्र्य दिलेल्या आफ्रिकन देशातून काँगोप्रमाणे गंभीर परिस्थिती निर्माण झाली नाही. टँगॉनिकांत एकच आफ्रिकन राजकीय पक्ष होता व वसाहत करून राहिलेले ब्रिटिश लोक नव्हते. म्हणून त्याला लवकर स्वातंत्र्य मिळाले. युगँडात दोन राजकीय पक्ष असले व तेथील चार आफ्रिकन राज्यामध्ये जरी थोडा मतभेद असला तरी सर्वांना संमत होईल अशी घटना करून युगँडाला स्वातंत्र्य दिले गेले. केनियाचा प्रश्न बराच गुंतागुंतीचा आहे. १९६० साली पहिल्या घटनापरिषदेच्या वेळी सर्व आफ्रिकन पुढारी एकमताचे होते, त्याचे कोणतेही राजकीय पक्ष नव्हते. पण त्यानंतर देशाला स्वातंत्र्य देण्याचे ब्रिटिश सरकारचे धोरण स्पष्ट झाल्यावर लहान आफ्रिकन जमातीतील लोकांना मोठ्या जमातीतील लोक राज्यसूत्रे आपल्या हाती घेऊन आपल्यावर अन्याय करतील अशी भीती निर्माण झाली ! केनियामध्ये किकुयू जमात संख्येने फार मोठी असून, तिच्याबरोबर आणखी एकदोन मोठ्या जमाती मिळाल्या तर बाकीच्या अनेक लहान आफ्रिकन जमातीवर कायमचा अन्याय होईल असे वाटल्यामुळे दोन आफ्रिकन राजकीय पक्ष निर्माण झाले आहेत. या दोन पक्षामध्ये कोणत्याही बाबतीत आज एकमत होणे मुष्कील होऊन बसले आहे ! नवीन घटनेमध्ये केनियाचे सहा प्रांत होणार असून प्रांतांना










विशिष्ट अधिकार घटनेतून मिळणार आहेत. लहान जमातींना खूष करण्यासाठी ही तडजोड आहे. या दोन्ही आफ्रिकन पक्षांनी–केनिया आफ्रिकन नॅशनल युनियन व केनिया आफ्रिकन डेमोक्रॅटिक युनियन–युरोपियन व एशियन सभासद आपल्या पक्षात घेण्याचे ठरविले आहे

## जुन्या पक्षांचा अस्त

या दोन प्रबळ आफ्रिकन राजकीय पक्षामुळे युरोपियन व एशियन यांच्या राजकीय संस्था यांना काहीच महत्त्व उरलेले नाही. पन्नास वर्षांहून जुन्या असलेल्या केनिया इंडियन कॉंग्रेसने आपले अंग राजकारणातून नुकतेच काढून घेतले आहे ! बाकीच्या युरोपियन व एशियन संस्था राजकारणात कोणत्यातरी एका आफ्रिकन पक्षाला सामील होत आहेत. केनियाच्या सध्याच्या वातावरणात आफ्रिकन, युरोपियन, व एशियन यांचे परस्परसंबंध अधिक मित्रत्वाचे होत आहेत यात शंका नाही. जरी एकमेकांबद्दलचे संशय व हेवेदावे पूर्णपणे नाहीसे झालेले नाहीत तरी स्वातंत्र्य मिळेपर्यंत परस्परांमध्ये बरीचशी मैत्री झालेली दिसून येईल असे वाटते. त्यासाठी एशियन व युरोपियन लोकांना आपला पूर्वीचा दृष्टीकोन बराच बदलावा लागेल; कारण कोणत्याही जमातीला यापुढे काही विशेष सवलती मिळू शकणार नाहीत.

## युरोपियन वर्चस्वावर आघात

आपल्या भवितव्याबद्दल युरोपियन व हिंदी लोकांना भीती वाटणे साहजिकच आहे. युरोपियन सरकारी नोकरांना loss of career बद्दल बरीच नुकसान भरपाई मिळणार आहे. त्यामुळे बरेचसे सरकारी नोकर पैसे घेऊन केनिया सोडून जात आहेत. केनियामध्ये युरोपियन जमीनदारांनी पुष्कळ पैसा ओतून पूर्वीची जंगलमय जमिनीची उत्तम प्रकारे मशागत केलेली आहे. केनियाचे मुख्य उत्पन्न व परदेशी निर्यात होणारा माल म्हणजे या शेतीचे उत्पन्न. या युरोपियन लोकांना या जमिनी विकून इंग्लडमध्ये किंवा इतरत्र जाणे अत्यंत जिवावर आलेले आहे. युरोपियन शेती बिघडली तर सबंध केनियाची अर्थव्यवस्था बिघडेल असे तज्ज्ञांचे मत आहे. युरोपियन लोकांना केनियामध्ये राहण्यास जरी पुष्कळ सवलती मिळाल्या तरी देशाची सर्वांगीण सुधारणा होण्यास त्यांचेच श्रम कारणीभूत झाले आहेत हे विसरून चालणार नाही. पन्नास वर्षांपूर्वी केनिया अत्यंत मागासलेला होता, रेल्वे व मोटार यांची वाहतूक जवळ जवळ नव्हतीच. आता उत्तम रेल्वे व विमानवहातूक या देशात सुरू आहे. मोटारींचे रस्ते सुधारले जात आहेत. उत्तम शहरें वसली आहेत. शेतकी व उद्योगधंदे यांचे उत्पन्न वाढत आहे. सव्वादोन लक्ष चौरस मैलांच्या या प्रदेशात लोकवस्ती फक्त ६० लाखांची ( म्हणजे एका मुंबई शहराच्या दीडपट ! ) आहे ! हवापाणी उत्तम आहे. आज राहाण्यास जगामध्ये केनिया सर्वोत्तम आहे असे जगप्रवास करून आलेले केनियाचे रहिवासीच सांगतात. परंतु एकंदर आफ्रिकन बहुजनसमाज अत्यंत गरिबीत असल्यामुळे स्वातंत्र्यानंतर राष्ट्रीय सरकारला लोकांचे राहणीचे मान वाढविण्यासाठी आर्थिक योजना आखाव्या लागतील.

## परदेशी चाललेला पैसा

आपल्या भवितव्याविषयी बरीच शंका निर्माण झाल्यामुळे गेल्या दोन अडीच वर्षांत केनियातून बराचसा पैसा परदेशी–मुख्यतः इंग्लंड व हिंदुस्थान–येथे गेला. अत्यंत वाईट प्रसंग येऊन देश सोडण्याची वेळ आली तर आपल्याजवळील शिलकीचा उपयोग व्हावा असा हेतू पैसे परदेशी पाठविणाऱ्याचे मनात असावा. त्यामुळे केनियामध्ये पैशाची टंचाई व आर्थिक मंदी निर्माण झाली आहे. त्याचा व परिणाम व्यापार व उद्योगधंद्यावर होत आहे. सध्या एशियन लोकात बरीच बेकारी वाढली आहे. नोकरी मिळाली नाही तर पुष्कळ हिंदी लोकांना हिंदुस्थानात परत यावे लागते. राजकीय घडामोडीमुळे कोणती परिस्थिती निर्माण होईल याचा अंदाज करता आला नाही तरी स्वातंत्र्यानंतर – म्हणजे सध्याची अनिश्चितता दूर झाल्यावर– लोकांचा आत्मविश्वास वाढेल व एकंदर परिस्थिती सुधारेल अशी आशा लोकाना वाटते.

## जुन्या-नव्या पिढीच्या भावना

केनियामध्ये वास्तव्य करून राहणारे बहुतेक सर्व हिंदी लोक त्या देशाचे रहिवासी ( ब्रिटिश प्रजाजन ) झाले असून त्यांचेजवळ ब्रिटिश पासपोर्ट आहेत. केनिया स्वतंत्र झाल्यावर त्यापैकी बरेचसे लोक स्वतंत्र केनि-

याचे रहिवासी होतील यात शंका नाही. हिंदुस्थानातून केनियात गेलेल्या लोकांना आपल्या मातृदेशाबद्दल आस्था व प्रेम वाटत असले तरी केनियामध्ये जन्मलेल्या मुलांना ही भावना नाही. केनियामध्ये जन्मलेल्या सध्याच्या नवीन तरुण व शिक्षित पिढीला केनियाबद्दल फारच आदर व अभिमान वाटतो. या तरुण पिढीला हिंदुस्थानातील भाषा, प्रांत व जात याबद्दलचे वाद मुळीच माहीत नाहीत.* आफ्रिकन लोकांबरोबर ही तरुण पिढी उत्तम प्रकारे मिसळू शकते. आफ्रिकन तरुण पिढीही झपाट्याने सुशिक्षित होत असून त्यांचे आचारविचार व धर्म वर्णद्वेषयुक्त नाहीत. नवीन केनियामध्ये सर्व धर्मांची व सर्व वर्णांची अशी एक नवीन पिढी निर्माण झाली तर केनियाचे भवितव्य खरोखर उज्ज्वल होईल व जगातील इतर लहानमोठे देश या नवीन देशाच्या उन्नतीकडे कौतुकाने पहात राहातील, अशी लक्षणे दिसत आहेत.

## सुधारलेल्या देशातील सुखसोयी व शिक्षण

सुधारलेल्या देशातील सर्व सुखसोयी आज केनियामध्ये उपलब्ध आहेत. जगातील रोजची बातमी देणारी दोन उत्तम इंग्रजी दैनिके नैरोबीला प्रसिद्ध होत असतात व तेथून विमानाने अथवा मोटारीने तीं ३०० मैलावर दूर असलेल्या मोंबासासारख्या गावी सकाळी ९-१० वाजता मिळू शकतात. शिवाय गुजराथी व स्वाहिली भाषेत दैनिक वर्तमानपत्रे नैरोबीहून प्रसिद्ध होतात. आफ्रिकन लोकांमध्ये वर्तमानपत्रांचा खप झपाट्याने वाढत आहे. शाळा आतापर्यंत युरोपियन, आफ्रिकन, अरब, व एशियन लोकांकरिता निरनिराळ्या असत. पण आता सर्व शाळातून सर्व वर्णांच्या विद्यार्थ्यांना त्यांच्या लायकीप्रमाणे घेण्यास सुरवात झाली आहे. शिक्षणाचे माध्यम इंग्रजी असून इंग्लंडमधील शाळांच्या धर्तीवर शिक्षणक्रम आंखलेला आहे. दुसरी भाषा म्हणून सरकारी शाळातून हिंदी, गुजराथी व पंजाबी भाषा शिकण्याची सोय आहे. सातवीपर्यंतचे प्राथमिक शिक्षण सक्तीचे आहे. पण त्यानंतर मात्र सातवीची सरकारी परीक्षा घेतली जाते व फक्त लायक विद्यार्थ्यांनाच पुढील हायस्कूलचा अभ्यास करण्यास ( Grammar school ) सवलत मिळू शकते. त्यानंतर केंब्रिजच्या मॅट्रिक परीक्षेसाठी शाळातून अभ्यासक्रम घेतात. उच्च शिक्षणासाठी जरी नैरोबी, कंपाला, व दारेसलाम, येथे कॉलेजे असली तरी त्यात प्रत्येक शाखातून फारच थोड्या जागा असल्यामुळे बरेचसे हिंदी विद्यार्थी हिंदुस्थान किंवा इंग्लंड येथे शिकावयास जातात. हिंदुस्थानातून केनियामध्ये गेलेल्या हिंदी लोकांमध्ये बहुसंख्य लोक गुजराथमधून गेलेले आहेत. त्यामुळे हिंदी लोकांचा बराचसा व्यापारासंबंधी व्यवहार गुजराथीमधून चालतो. त्याच्या खालोखाल पंजाबी लोक तेथे स्थायिक झालेले आहेत. सिंधी लोक थोडे असले तरी व्यापारात त्यांनी महत्त्वाचे स्थान मिळविलेले आहे. महाराष्ट्रीय व दक्षिण भारतातील लोक अगदीच थोडे असून बरेचजण नोकरी, डॉक्टरी अथवा वकिली व्यवसाय करीत आहेत.

## जामो केन्याटा यांचा कारावास व सुटका

केनियाचे सुप्रसिद्ध आफ्रिकन पुढारी जामो केन्याटा यांनी अनेक वर्षांपूर्वीपासून केनियाला स्वातंत्र्य मिळावे म्हणून चळवळी केल्या. १९५२ नंतरच्या अत्याचारी कृत्ये करणाऱ्या माऊ माऊ चळवळीशी त्यांचा संबंध जोडला जाऊन त्याना सहा वर्षांचा तुरुंगवास भोगावा लागला व त्यानंतर काही वर्षे फार दूरच्या ठिकाणी स्थानबद्ध रहावे लागले. त्यांच्या सुटकेसाठी सर्व आफ्रिकन व हिंदी पुढाऱ्यांनी पुष्कळ प्रयत्न केले व शेवटी आफ्रिकन मंत्रिमंडळ स्थापन झाल्यावर त्यांच्या प्रयत्नाना यश आले ! तथापि त्यांच्या सुटकेने अपेक्षा केल्याप्रमाणे आफ्रिकन जमातीतून एकी निर्माण झाली नाही व त्यामुळे आज केनियात जामो केन्याटाचा एक पक्ष ( कानू ) व न्गालाचा दुसरा पक्ष ( काडू ) असे दोन प्रबळ पक्ष निर्माण झाले आहेत ! नवीन घटनेखाली आणखी ४-५ महिन्यांनी निवडणुका होतील व यशस्वी पक्ष नवीन सरकार स्थापून केनियाला पूर्ण स्वातंत्र मिळण्यासाठी ब्रिटिश सरकारशी वाटाघाटी करील. स्वातंत्र्यासाठी केलेल्या चळवळीत आफ्रिकन देशात केनियाने पुढाकार घेतलेला

* माझ्या बरोबर हिंदुस्थानात रजेवर आलेल्या माझ्या १२ वर्षांच्या मुलाला इकडे जिकडे तिकडे दिसणारे जातींचे गौडबंगाल पाहून आश्चर्य वाटले !



अनुक्रमणिका








असला तरी प्रत्यक्ष स्वातंत्र्य मिळण्यात केनिया मागे पडला आहे. व त्याचे मुख्य कारण म्हणजे आफ्रिकन पुढाऱ्यांची भांडणे व ब्रिटिश वसाहतवाल्यांचे देशातील हितसंबंध !!

### हिंदी लोकांची आपल्या देशाला मदत

हिंदुस्थानातून निरनिराळ्या हेतूने आर्थिक मदत मिळविण्यासाठी केनियामध्ये गेलेल्या लोकांना तेथील लोकांनी सक्रिय व हार्दिक पाठिंबा दिलेला आहे. केनियातील हिंदी लोकांनी हिंदुस्थानला किती साहाय्य केले याची पुरेशी कल्पना कदाचित् हिंदुस्थानातील लोकाना नसावी. हिंदुस्थानातून केनियामध्ये आलेले लहानमोठे सर्व लोक तेथील हिंदी लोकाचे औदार्य व आतिथ्यशीलता याची तोंडभरून स्तुती करतात. हिंदुस्थानवर कोसळलेल्या अनेक लहानमोठ्या नैसर्गिक आपत्तीत केनियाच्या हिंदी जनतेने पुष्कळ आर्थिक साहाय्य केलेले आहे. हिंद-चीनयुद्ध सुरू झाल्यावर केनियाने पंधरा दिवसात ५० हजार पौंड हिंदुस्थानच्या साहाय्याकरिता जमविले. केनियातील हिंदी लोकांची वस्ती सुमारे १॥ लाख आहे. मात्र हिंदुस्थानातील लोकांना केनियाच्या लोकांबद्दल तितकी आस्था व आपुलकी वाटत नाही असे अनेक वेळा वाटते ! आशिया व आफ्रिका खंडातील सर्व देश स्वतंत्र झाल्यावर त्यांचे परस्पर हितसंबंध व मैत्री वाढत जातील अशी आशा करावयास हरकत नाही.

---





अनुक्रमणिका






## वाचकांचे-विचार

[ गेल्या अंकातील श्री. ना. गो. चापेकर यांच्या ' न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ' या लेखावरील वाचकांची प्रतिक्रिया आम्ही मागविली होती. त्याप्रमाणे काही वाचकांकडून आलेले विचार येथे देत आहो. —संपादक ]

(१)

' न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ' हे मनुस्मृतीतील गाजलेले वचन विसाव्या शतकातील स्त्रीला लागू करण्याचा श्री. चापेकर यांचा प्रयत्न आश्चर्यजनक वाटतो ! स्वातंत्र्य या शब्दाचा लेखकाने केलेला मनुकल्पित अर्थ दिशाभूल करणारा आहे. वेगळे किंवा एकटे राहू नये असा या वचनाचा अर्थ असता तर त्यावर आक्षेप घेण्याचे कारणच नाही. परंतु खुद्द लेखकाने सुद्धा तो तसा घेतलेला नाही हे लेखावरून सिद्ध होत आहे. एकटे रहाणे कोणत्याही व्यक्तीस, मग ती स्त्री असो की पुरुष असो, घातुक आहे हे सांगण्यास शास्त्रवचनाची गरज नाही. हिंदुसमाजाची व मनुस्मृतीची ज्यांना तोंडओळख आहे त्याना हा अर्थ पटण्यासारखा नाही. या धर्मग्रंथात जवळ जवळ प्रत्येक ठिकाणी शूद्र व स्त्रिया यांना एकाच माळेत ओवले आहे. व शूद्रांचे बद्दल मनूचा दृष्टिकोण काय होता हे मी सांगण्याची गरज नाही.

' स्त्रीला संसारात सन्मानाचे स्थान दिले जात असे ' – ' स्त्रियाना पूज्य मानण्याचा आदेश मनूने दिला आहे ' – ' पत्नीला धर्मकृत्यात मानाचे स्थान देण्यात आले आहे ' अशी अनेक वचने लेखात आहेत. आजच्या सुशिक्षित स्त्रीपुरुषांना आपला सामाजिक इतिहास बराच अवगत आहे असे मला वाटते. हे जर सर्व खरे असते तर आगरकर, कर्वे यांचे सारख्या महर्षींना समाज सुधारणेसाठी–विशेषतः स्त्रियांची सामाजिक परिस्थिती सुधारणेसाठी–आयुष्य वेचण्याची गरजच पडली नसती. हिंदुसमाजाने काढले तेवढे स्त्रियांचे धिंडवडे, इतर कोठल्याही समाजाने काढलेले मला तरी माहीत नाही. मनूचे स्त्रीबद्दलचे मत तर जग जाहीर आहे. धर्मकृत्य एकट्या स्त्रीला, मग ती कुमारिका असो, सवाशीण असो, की विधवा असो करताच येत नाही. नवऱ्याच्या हाताला हात लावणे म्हणजेच मानाचे स्थान मिळविणे आहे का ? प्रत्यक्ष बाप जिवंत नसल्यास आईला मुलामुलींची लग्ने लावता येत नाहीत की मुलगी बापाचे श्राद्ध करू शकत नाही. कोणीही तिऱ्हाइत पुरुष हे करू शकतो हा स्त्रियांचा बराच मोठा मान आहे म्हणायचा !

' स्त्रीचे लग्न एकदाच ', ' घटस्फोट आमच्या संस्कृतीला मारक आहे ' असे चापेकर सांगतात. ' स्त्रीच्या पुनर्लग्नाचा हेतु स्त्रीला विषयसुख मिळावे ' हाच आहे, प्रजावती स्त्रीने पुनर्लग्न केल्यास किंवा घटस्फोट घेतल्यास पहिल्या मुलांचे हाल होतात ! हीं सर्व विधाने पुरुषास लागू नाहीत का ? घटस्फोट हा आपली चूक सुधारण्याचा अंतिम मार्ग आहे. दोन व्यक्तींचे एकमेकाशी पटलेच नाही, त्यांच्यात वैमनस्य आले तरच अनुसरण्याचा तो मार्ग आहे. दोघेही समजूतदार असल्यास त्याना या कायद्याची गरजही वाटणार नाही. नुसता कायदा केल्याने घटस्फोट वाढत नाहीत. परंतु मोडलेली कुटुंबे कायद्याने घट्ट बांधून सांधली जातील ही कल्पना खरी नाही. नुसत्या घटस्फोटित आईबापांची मुले बिघडतात असे नसून दुराचारी व भांडखोर आईबापांची








मुलेही विकृत होतात हे विसरून चालणार नाही. घटस्फोट हा बदलणाऱ्या समाजरचनेचा एक भाग आहे. कुटुंब सुखी व एक संध ( homogeneous) करण्याचाही तो एक मार्ग आहे.

एकाकी जीवन पुरुषाला जितके दु:सह असते तितकेच ते स्त्रीलाही असते. स्त्री व पुरुष याना संभोग व प्रजोत्पत्ती याखेरीज इतर अनेक बाबतीत एकमेकांची गरज असते. एकमेकांचे सहवासात त्यांच्या आयुष्याला पूर्णता येते. एकमेकांवर अवलंबून रहाण्यात जिवन्तपणा असतो. मुले नसताना सुद्धा स्त्रीपुरुष एकमेकास हवी असतात. मुले मोठी झाली, दूर गेली, म्हणजे ही गरज वाढते. प्रजोत्पादनाचा व प्रजा संवर्धनाचा काल माणसाच्या आयुष्याचा एक भाग आहे. ते संपूर्ण जीवन नव्हे. संभोग म्हणजे प्रजोत्पादन हे समीकरण सर्वस्वी चूक आहे. मानवेतर सृष्टीचा तो नियम आहे. इतर प्राणी प्रजोत्पादनाकरताच संभोग करतात. गर्भधारणा झाली म्हणजे त्यांना संभोगाची गरज लागत नाही. पिले मोठी होईपर्यंत नरमादी त्यांचे भरणपोषण व संरक्षण करतात व नंतर ती आपापल्या दिशेने चालू लागतात. पुढच्या प्रजोत्पादनाच्या मोसमात नवा संसार. मानवी स्त्री–पुरुषांनी अशा तऱ्हेचे आयुष्य घालविण्याचे ठरविल्यास समाजास कितपत पोषक होईल ? परंतु माणूस हा उत्क्रांतीच्या शिखरावर आहे. त्याला भावना आहेत. गतकालाच्या स्मृति आहेत. आयुष्यातील सर्वोच्च आनंदाचे, एकतेचे, व प्रेमाचे क्षण तो संभोगाने मिळवू शकतो. प्रजोत्पादन हे संभोगाच्या अनेक उद्दिष्टांपैकी एक उद्दिष्ट आहे. त्या खेरीज इतर वेळी सुद्धा माणसाला संभोगाची गरज असते. ती नैसर्गिक ( फिजिऑलॉजिकल ) गरज आहे. त्याला यंत्रवत् बनवणे किंवा प्रजोत्पादनाकरिता करावे लागणारे पाप समजणे कोतेपणाचे आहे.

'नोकरीवाली स्त्री संसारी स्त्री होऊ शकत नाही' 'स्त्रियांची नोकरी हा कुटुंबसंस्थेवरील मोठा आघात आहे' 'व्यक्तीला मतदानाचा हक्क देऊन व स्त्रियांना नोकरीचे मुक्तद्वार ठेवून कुटुंबसंस्थेचे पेकाटच मोडले आहे' या सर्व विधानात फक्त थोड्याशा मध्यमवर्गीय स्त्रियांचाच विचार केलेला आहे. अनादि कालापासून शेतकरी कामकरी वर्गाच्या स्त्रिया मोलमजुरी करून कौटुंबिक खर्चाला हातभार लावीत आल्या आहेत. त्याना संसार नसतात का ? गेल्या १५।२० वर्षात अनेक सुशिक्षित स्त्रियांनी नोकऱ्या करून आपले व आपल्या कुटुंबाचे किंवा वडिलाचे संसार सुरक्षित ठेवल्याची उदाहरणे थोडी आहेत का ? बदलत्या परिस्थितीत कुटुंबाची व संसाराची कल्पना बदलणारच. ही बदलणारी कल्पना पुरुषाचे बरोबरीने जबाबदारी अंगावर घेणाऱ्या स्त्रीला उपयुक्त व सुखावह कशी होईल याचा विचार करणे जरूर आहे. घरात दहा माणसांचा रगाडा उपसून बाहेरचे काम करणाऱ्या स्त्रीची ओढाताण पाहून पुरुषांनी आपल्या पुरुषत्वाच्या कल्पना बदलण्याची वेळ आली आहे. संसारात, घरकामात, मुलाचे संगोपनात, स्त्रीच्या बरोबरीने पुरुषांनी वाटा उचलला तर संसार खऱ्याखुऱ्या अर्थाने दोघांचा होईल व कुटुंब मोडण्याची काहीही मीति रहाणार नाही. अनेक लोकांनी घरकामाकरिता एकाच स्त्रीवर अवलंबून रहाण्याची सवय कमी करून जुन्या बुरसटलेल्या धर्मकांडाच्या व मानापमानाच्या कल्पना बाजूला सारून समाजाने कर्तृत्ववान् स्त्रीला वाव द्यावा व कुटुंबसंस्था टिकते की नाही ते पहावे. स्त्रीला कुटुंबाचा एक महत्त्वाचा घटक म्हणून जगावयाचे आहे. पुरुषांशी बरोबरी करण्यात वाईट असे काय आहे ? ज्या समाजात पुरुष व स्त्रिया यांची बौद्धिक पातळी समान असते तो समाज केव्हाही जास्त कार्यक्षम व पुढारलेला रहातो.








स्त्रियांनी नोकरी न करता घरी बसल्यास उत्पन्न होणाऱ्या आर्थिक अडचणींवर एक अभिनव तोडगा सुचविण्यात आलेला आहे. ' पति-पत्नी व अज्ञान मुले ह्यांना उपजीविकेला लागणारा आवश्यक खर्च किती येतो हे निश्चित करून तदनुसार प्राथमिक पगार ठरविण्यात आल्यास हा प्रश्न आपोआपच सुटेल. ' पगार अर्थात् पुरुषाचा ठरणार. मग पुरुष नसलेल्या कुटुंबाने काय करावे ? देशातील सर्वच कुटुंबाना हा कायदा लावावा लागेल. ही कल्पना मात्र ' कल्पनारम्य ' आहे. समाजाला ती कितपत परवडेल हे मात्र अर्थशास्त्रज्ञांनी पहावे !

सुशिक्षित स्त्रियांनी रिकामे बसू नये असेही चापेकरांना वाटते. कारण स्त्रियांनी करावयाचे अनेक उद्योग त्यांनी सांगितले आहेत. " आयांनी स्वतःच्या मुलांना शिकविले तर शाळा हव्यात कशाला ? " गांवातील मुलांचे शिक्षण या सुशिक्षित स्त्रियांचे स्वाधीन करा. तुमच्या शाळाखात्याची बचत होईल. गांवात राहून घरबसल्या त्याना हे सहज करता येण्यासारखे आहे " " ग्राम पंचायती व नगरपालिका याची कामेही घर बसल्या स्त्रियांनी करावी ! " यातून अनेक प्रश्न निघतात. एकतर सध्या ज्ञानाचे व तद-नुषंगाने शिक्षणाचे क्षेत्र इतके विस्तृत झाले आहे की ५।६ वर्षांवरील मुलांना कोणीही एक व्यक्ति संपूर्ण शिक्षण देऊं शकणार नाही. म्हणजे अनेक स्त्रियांनी मिळून ही कामगिरी वाटून घेतली पाहिजे. मुलांचे संख्येप्रमाणे लहान मोठी जागा आलीच. म्हणजे पर्यायाने शाळा पण आलीच. सध्या पैसे घेऊन शिक्षिका होणाऱ्या स्त्रियांनी विनामूल्य काम केल्यास त्याना संसाराकडे जास्त लक्ष देण्याची संधी मिळेल हे मला तरी कळत नाही. त्याचप्रमाणे ग्राम-पंचायती व नगरपालिका यांची कामे इतकी वाढली आहेत की ती घरबसल्या करणे शक्यच नाही. आणि ज्यांना व्यवस्थित करावयाची आहेत त्याना वेळ प्रसंगी स्वतःच्या संसाराकडे संपूर्ण दुर्लक्ष करावे लागते हे सर्वांस माहीत आहे.

पुरुषाप्रमाणे ज्ञानाची अनेक दालने स्त्रियांना खुली झाली तरच त्या सन्मानाने समाजांत वावरू शकतील हे निर्विवाद आहे. समाज हा कुटुंबांचा झालेला नसून व्यक्तींचा झालेला आहे. हे सामाजिक सत्य आहे. लोकशाहीचे तत्त्वज्ञान व्यक्तिप्रधान आहे. विकास व्यक्तीचा होत असतो. प्रगल्भ व्यक्तींचे कुटुंब प्रगल्भ व सामाजिक दृष्ट्या मोलाचे ठरेल. म्हणून समाजा-तील प्रत्येक व्यक्ति कशी प्रगल्भ होईल हे समाजाने बघितले पाहिजे. कुटुंबसंस्थेची काळजी करणारांनी पहिल्या प्रथम व्यक्तीची काळजी करावी. आधुनिक स्त्रीला आपले नैसर्गिक कार्य अंगाबाहेर न टाकता समाजांत संपूर्ण व विकसित जीवन जगावयाचे आहे. स्त्री किंवा पुरुष आपल्या जीवनात एकट्याचा विचार कधीच करू शकणार नाहीत. समाजाचे एकमेकास पूरक परंतु स्वतंत्र घटक म्हणून राहण्याचा व वाढ-ण्याचा दोघांनाही सारखाच अधिकार असावा एव-ढेच माझे म्हणणे.

मुंबई ११।१२।६२ — डॉ. इन्दुमती पारीख

---

( २ )

श्री. ना. गो. चापेकर यांच्या लेखाचा आशय जो मी समजलो तो असा : सांस्कृतिक जीवन-मूल्यांची जोपासना किंवा सांस्कृतिक जीवनमूल्यांचा विकास कुटुंबसंस्थेमुळेच होईल. म्हणून कुटुंब-संस्थेचे रक्षण करणे जरूरीचे आहे. आज समाजाची घडण होत आहे. तिच्यामागे विचारांचा पूर्ण अभाव आहे. म्हणून कुटुंबसंस्था सुरक्षित केल्यानेच समा-जाच्या घडणीतील विचारांचा अभाव दूर होईल. अन्यथा आजच्या प्रवाहात भारतीय ( सांस्कृतिक ) जीवन कुठे वाहून जाईल त्याचा नेम नाही.

श्री. चापेकरानी अत्यंत तळमळीने मांडलेले विचार वाचून माझे चित्त त्यांना अनुकूल झाले. आज जी अवस्था निर्माण झाली त्याचे श्री. चापे-कर म्हणतात त्यापेक्षा दुसरेही एक कारण आहे. श्री.



अनुक्रमणिका






चापेकरांच्या म्हणण्याप्रमाणे सामर्थ्याची अनेक कार्यक्षेत्रे निर्माण झाल्यामुळे किंवा या सामर्थ्याच्या कार्यक्षेत्रांनी स्त्री-पुरुषांना आवाहन केल्यामुळेच कुटुंबसंस्थेला निराळे वळण लागले. हे जरी खरे आहे, तरी सामर्थ्याच्या कार्यक्षेत्रांपाठीमागली मूळ प्रेरणा भौतिक आहे हे ध्यानात घेतले पाहिजे. भौतिकतेने ( आत्मिक संबंधाने बांधलेल्या ) कुटुंबसंस्थेवर प्रभाव पाडला व भारतीय जीवनाला पुराच्या पाण्याने वाहून जाण्यासारखे रूप आले.

व्यक्तीव्यक्तीत जो एक आत्मिक संबंध वाढायला हवा व ज्याची समाजधारणेकरिता गरज आहे त्या दृष्टीने आजच्या समाजवादाच्या प्रक्रियेत आत्मिक संबंधाला कुठेच स्थान नाही.

मनुष्य उपभोक्ता ठरवून तदनुसार त्याची गरज पूर्ण करण्याचा हव्यास आज सर्वत्र आहे. पण मनुष्य उपभोक्ता असूनही तो विकासाच्या दृष्टीने कुठल्यातरी मर्यादेने बंदिस्त आहे याची जाणीव पुसट झाली असल्यामुळे माणसाची गरज मोकाटपणे संचार करू लागली आहे. हेच स्त्रियांच्या बाबतीतही कमीजास्त प्रमाणात मानता येईल. पण, ही पुसट झालेली जाणीव पुन्हा ठळक करण्याची आवश्यकता आहे. ते कुटुंबसंस्थेमुळेच शक्य होईल. कारण कुटुंब आत्मिक संबंधाने बद्ध झालेले असते.

समाजवादामुळे कुटुंबसंस्था आजच्यापेक्षा अधिक सुसंघटित ठेवता आल्यास ते सर्वांनाच हवे आहे. पण भौतिकतेच्या नियंत्रणात कुटुंबसंस्था संघटित करणे जमेलसे वाटत नाही. तेव्हा, आत्मिक नियंत्रणात भौतिकता आणि कुटुंबसंस्था राहिली व तसे स्वरूप समाजवादाला आले तर समाजवादापासून कोणत्याही काळी तोटे व्हायचे नाहीत.

मूल ( जि. चांदा ) —बाबूराव चंदावार

## ( ३ )

जर स्त्रीला स्वातंत्र्य देणे म्हणजे वेगळे राहू देणे, एकटे राहू देणे, असा अर्थ गृहीत धरायला हवा, व त्या अर्थाने तिला तसे राहू देणे समाजाच्या व कुटुंबाच्या दृष्टीने योग्य होणार नाही, तर तोच न्याय पुरुषालाही लागू करणे क्रमप्राप्त होईल. कारण कुटुंब हा जरी ढोबळ दृष्टीने समाजाचा घटक असला तरी प्राणिशास्त्राच्या दृष्टीकोनातून पाहिल्यास व्यक्ति हाच त्याचा मूलभूत घटक असल्याचे आढळून येईल. एखाद्या व्यक्तीला एकाकी जीवन कंठणे फार काळ शक्य नसते, म्हणून तिला दुसऱ्याचे साहचर्य, दुसऱ्याबरोबर सहजीवन जगणे, जरूर असते; जीवनाची वाटचाल ही एकतर्फी नसते तर ती देवाण–घेवाणीच्या स्वरूपात असते. या दोन्ही क्रियांना दोघांचाही, म्हणजे पुरुषाचा व स्त्रीचाही, हातभार लागत असतो. जोपर्यंत स्त्री ही पुरुषाप्रमाणेच कर्तबगार आहे असे आढळून आल नव्हते तोपर्यंत तिलाही आपल्याप्रमाणे स्वातंत्र्य हवे ही कल्पनासुद्धा त्याला मान्य नव्हती. पूर्वीचे राजा–प्रजेचे संबंध लक्षात आणावेत व आता भारतात लोकशाही कोणत्या स्वरूपात आहे व ती कोणत्या स्वरूपात परिणत झाली तरच तिचा भविष्यकाल उज्ज्वल आहे याची कल्पना करावी, म्हणजे यावर जास्त प्रकाश पडेल.

मालाड —नारायण रामचंद्र आंगले








# बौद्धागमार्थसंग्रहः

पाली व संस्कृत ] [ मूल्य रु. २०

संपादक : डॉ. पी. एल्. वैद्य एम्. ए., डी. लिट. ( पॅरिस )

अखिल भारतीय कीर्तीचे पंडित श्री. वैद्य यांनीं पाली व संस्कृत अशा समग्र बौद्ध साहित्याचें मंथन करून बुद्धचरित्रासंबंधीं व बुद्धाचे उपदेशपर संदर्भ यांत ग्रथित केले आहेत. या ग्रंथाच्या परिशीलनानें बौद्ध धर्माचें वा हीनयान व महायान या दोन्ही बौद्ध संप्रदायांचें सर्वांगीण दर्शन होईल. विद्वान व विद्यार्थी या दोघांना संग्राह्य असा हा संदर्भ ग्रंथ आहे. मूळ पाली व मूळ संस्कृत अशा बुद्धोक्तींचा हा संग्रह आहे.

याचा मराठी अनुवाद महाराष्ट राज्य, साहित्य व संस्कृति मंडळ लवकरच प्रसिद्ध करणार आहे.

बुद्धवंस, चरियापिटक, निदानकथा, ललितविस्तर, सुत्तनिपात, महावग्ग, चुल्लवग्ग, सुमंगलविलासिनी, महापरिनिब्बाण, समन्तपासादिका, दीघनिकाय, संयुत्तनिकाय, अंगुत्तरनिकाय, मज्झिमनिकाय, विसुद्धिमग्ग, बोधिचर्यावतार, मिलिन्दपन्ह, थेरगाथा, थेरीगाथा, मध्यमकशास्त्र, शालिस्तंबसूत्र, समाधिराजसूत्र, लङ्कावतारसूत्र, सद्धर्मपुण्डरीक या ग्रंथांतील बुद्धचरित्र, भिक्षुभिक्षुणीशिक्षण, धर्म, कीर्णक व संगीति अशा पांच विषयावरील संदर्भ यांत घेतले आहेत.

मिळण्याचें ठिकाण —

प्राज्ञ पाठशाळा मंडळ, वाई ( सातारा )








# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | किंमत |
|---|---|---|
| (१) | धर्मकोश- व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | |
| | साधी बांधणी ... ... ... | ५२·०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | ७३·०० |
| (२) | धर्मकोश - उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | |
| | साधी बांधणी ... ... ... | ११०.०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १३८·०० |
| (३) | धर्मकोश- संस्कारकाण्ड भाग १ ला .... | ४५·०० |
| | कापडी बांधणी ... .... ... | ६२·०० |
| (४) | मीमांसादर्शन ... ... ... ... | २५·०० |
| (५) | मीमांसाकोश ... भाग १ ते ५ | १६५.०० |
| (६) | कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... ... | ६·०० |
| (७) | बौद्धागमार्थसंग्रहः .... ... ... | २०·०० |
| (८) | हिंदुधर्माची समीक्षा ( लक्ष्मणशास्त्री जोशी ) ... | ५·०० |
| (९) | वैदिक संस्कृतीचा विकास ... .. ... | ६·०० |
| (१०) | नवमानवतावाद ... ... ... ... | २·५० |
| (११) | मानवाचा आदर्श ... ... ... ... | ३·०० |
| (१२) | चार्वाक – इतिहास आणि तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) ... | ३.०० |
| (१३) | गीता-प्रवेश ( डॉ. गो. वि. देवस्थळी ) ... | २·५० |
| (१४) | महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना ( श्री. चा. अ. दाभोलकर ) .... | २·०० |